# गालबोट

[ गोमंतकाच्या पार्श्वभूमीवर आधारलेली कादंबरी ]

लेखक—ना. के. शिरोडकर

किंमत २॥ रुपये

प्रकाशन काल..........................एप्रिल १९४१

## श्री. ना. के. शिरोडकर

### यांचीं प्रकाशित पुस्तकें—

१ समईतील ज्योत ! .... .... .... नाटिका

२ नवें जहाज .... .... .... कथासंग्रह

३ पांखर .... .... वेश्याव्यवसायविषयक कादंबरी

४ मातीचें घर ! काश्मिरच्या पार्श्वभूमीवर आधारलेली कादंबरी

५ किमया .... .... .... रुपान्तरीत कथासंग्रह

६ गालबोट .... गोमन्तकाच्या पार्श्वभूमीवर आधारलेली कादंबरी

# ऋण

...कांहीं वर्षांपूर्वींची गोष्ट आहे. त्यावेळीं एका सुविख्यात अमेरिकन फिल्म कंपनीचा नुकताच मुंबईत येऊन दाखल झालेला इंग्रजी भाषेंतील एक अतिसुंदर बोलपट माझ्या पहाण्यांत आला होता. त्या बोलपटाला कथानक असं फारसं नव्हतंच. आणि जें थोडंबहूत होतं त्यांतील डोळ्यांना दिपवून सोडणारें निसर्गरम्य वातावरण व भावनेला उद्दीपीत करून सोडणारे चमत्कृतिजन्य नाट्यप्रसंग यांचा माझ्या मनावर झालेला आत्यंतिक परिणाम याचं दृश्यफल म्हणजेच ही कादंबरी होय. तंत्रवादी टीकाकारांनीं प्रादेशिकतेच्या दृष्टीनं या कादंबरीकडे पाहूं नये असं त्यांना आधींच सुचवून ठेवावसं वाटतं. या कादंबरीचा आणि महाराष्ट्राचं नंदनवन म्हणून प्रसिद्ध असलेल्या गोमंतकाचा कांहीं सबंध आला असेल तर तो पार्श्वभूमीच्या दृष्टीनं, प्रादेशिकतेच्या खऱ्या अर्थानं नव्हे...

लेखक.

# साक्षीदाराचें प्रयाण

१

नदीच्या त्या अस्मानी रंगाच्या पायघडीवरून मंद मंद पावलं टाकीत हळदोण्याकडून आलेली ती होडी पणजी बंदराकडे तोंड करून चालली होती. बांधाच्या एका कडेनं तिचं तें प्रयाण चालू होतं. तांडेल वल्हे मारीत आणि त्यामुळें इतका वेळ संथ असलेला खाऱ्या पाण्याचा तो निरुंद जलमार्ग चुळबुळ करूं लागे. साहजिकच बांधावर रांगेनं उभीं असलेलीं तीं झाडझुडपं व त्यांवर बसून विश्रांती घेण्यांत निमग्न झालेले पक्षी ती चुळबुळ ऐकत नि दचकून जात. कुणी तो भयप्रद इषारा मानून बसल्या जागेवरून भुर्कन् पळ काढीत. तर कुणी ‘ कुई-कुई ’ अगर ‘ क्यॅरांव क्यॅरांव ’ असे भिन्न स्वरूपाचे आवाज काढून आपला धीटपणा प्रगट करीत—

आकाशांत एका बाजूला तांबडं फुटलं होतं. त्यामुळें अंधाराचं पृथ्वीतलावरील वर्चस्व हळुहळू नष्ट होण्याइतकी शंका घ्यायला साधार पुरावा मिळत होता. चांदोबाला घरची ओढ लागली होती. सारी रात्र नभोमंडळांत गस्त घालून दमल्याभागल्यामुळें त्याला तशी ओढ लागणं हें अस्वाभाविक नव्हतं. तो निसर्गाघरचा चाकर असला तरी पृथ्वीचा एक वाटाड्या होता. साहजिकच त्याला उत्साहहीन पाहून तितक्यांत सृष्टीचीही गाढ तन्मयता भंग पावली.

शेजारच्या एका किनाऱ्यावर एकोशी गांव वसलं होतं. मागें डोंगरटेकडी व समोर खारी नदी व मध्यें छोटीं छोटीं घरें नि झोंपड्या अशी त्या गांवची रचना होती. सह्याद्रीच्या पायथ्याशीं वसलेल्या गोमन्तकाचा–तें खेडं म्हणजे–एक नयनरम्य साज होता. त्या चिमुकल्या प्रांताची ती शोभा होती. नारळीच्या बागांतून जसं त्या गांवचं सौंदर्य उठून दिसत होतं, तसंच खाऱ्या मासळीचा गांवभर वास सुटल्यामुळें तेथील ठळक अशा एका व्यापारधंद्याची व त्यावर उदरनिर्वाह करणाऱ्या तारी लोकांच्या दाट वस्तीची अंधुकशी कल्पना येत होती. नदीच्या पृष्ठभागावर पऱ्हेळ तरंगत होते. पहिला कोंबडा नुकताच आरवला होता. लोक अजुन जागे झाले नव्हते.

नाहीं म्हणायला हळर्णवाड्यांतील एका चिरेबंदी घरांतील सोप्यावर क्षणापूर्वीं कुणीतरी उठून दिवा लावलेला होता. दिवा पेटविलेली व्यक्ति अंथरूणावर बसली होती. त्या व्यक्तिचं नांव बेतू. दिवस थंडीचे असल्यामुळें त्यानं शरिराभोंवतालीं कांबळ पांघरली होती. क्षणांत त्यानं उशीजवळ पडलेलं फोलीन उचललं. त्यांतून एक विडी काढून

घेतली. पुन्हां तें फोलीन जागच्या जागेवर ठेवून दिलं. तो उठून उभा राहिला. दिव्यापाशीं गेला. आणि हातांतील विडी त्यावर पेटवून त्यानं ती तोंडांत धरली. तो सोप्याबाहेर पडला. जवळच नदीला लागून पुरुषभर उंचीची धड होती. त्या धडेखालीं जाऊन नेसण वर करीत तो × × × × बसला.

पांच मिनिटानंतर तो पुन्हां वर आला.

घराच्या मागील दारीं तीन दगड मांडून त्यांची चूल बनविली होती. तीवर स्नानाला पाणी तापविण्यासाठीं मातीची एक मडकी ठेवली होती. आंत थंड पाणी होतं. तिथं जातांच त्यानं चुलींतील राखेंतून एक कोळसा उचलून घेतला. त्यानं दांत साफ केले. जवळचा तांब्या घेऊन तो मडकींतील पाण्यांत बुडविला आणि तो बाहेर काढून त्यांतील पाण्यानं तोंड धुवायला सुरवात केली.

तोंच कुणाचं तरी खांकरणं त्याच्या कानांवर आलं. त्यानं समोर दृष्टि फेंकली. शेजारच्या घरांतील गुरांच्या गोठ्यांत एक म्हातारी बाई शेण नेण्यासाठीं आली होती. काळोखामुळें त्या बाईचा तोंडवळा जरी बेतूला स्पष्ट दिसला नाहीं, तरी तिच्या आकृतीवरून ती कोण असावी हें त्यानं तेव्हांच ओळखलं. त्यानं हांक मारली—"दुगूआक्का !"

म्हातारीनं 'ओ' दिली. कोण म्हणून चौकशी केली. उत्तर मिळतांच तिनं विचारलं—"इतक्या पहांटेला रे कां उठलास बेतू? कुठं बाहेर-गांवीं वगैरे जायचं आहे कीं काय?"

"होय!"

"कुठें?"

" म्हापशाला !—"

"—आणि इतक्या सकाळीं ?—"

"सहाच्या आंत म्हापशाला जाऊन पोंचायचं आहे मला !"

"कां रे ?"

"पोंबुर्पेच्या दुर्मिग भाटकारावर त्याच्या मुणकाऱ्यानं केलेल्या खटल्याची आज म्हापशेच्या कोर्टांत सुनावणी होणार आहे ! तुला ठाऊक आहे ना तें मागचं प्रकरण ?—"

"—आहे माहित ! मोठा हलकट आहे तो दुर्मिग ! पशू मेला ! नात शोभेल अशा पोरीवर बलात्कार केला म्हणे या सैतानानें ! आणि तोहि आपल्याच भाटांत रहाणाऱ्या एका गरीब मुणकाऱ्याच्या पोरीवर—"

"–पण मला नाहीं वाटत त्या मुणकाऱ्याला न्याय मिळेल असं–"

"कां बरं ?"

"त्याला कारण आहे ! दुर्मिग पडला भाटकार ! लाखों रुपयांचा धनी ! त्यानं केवढाही मोठा गुन्हा केला तरी पैशांच्या जोरावर त्याला तो पचवून टाकणं अशक्य नाहीं ! मुणकारी करून करणार काय ? घरांतील भांडींकुंडीं विकून हा कोर्टाची पायरी चढणार ! उद्यां ती संपली, कीं पैसा नाहीं म्हणून बोंबलत सुटणार ! आणि पैसा नाहीं तिथं न्याय नाहीं, ही तर दुनियेची रीत—"

"खरं आहे ! पण कायरे बेतू, तुझा काय संबंध या प्रकरणांत ?—"

"वा: ! मी तर साक्षीदार आहे या खटल्यांत—"

" कुणाच्या बाजूनं ?"

" दुमिंग भाटकाराच्या—"

" म्हणजे तूं त्या मुणकाऱ्याविरुद्ध साक्ष देणार ?"

" अर्थात् !"

" आणि ती कां ? "

" पैशासाठीं !"

" एकूण खोटी साक्ष देणार तर तूं ? "

" खरं सांगू का तुला दुगूआक्का, माझ्या दृष्टीनं खऱ्याखोट्याला मुळीं महत्वच नाहीं ! मी फक्त जाणतों पैसा ! आणि तो मला पाहिजे आहे—"

" म्हणून रे कांय, असले धंदे करायचे ? एकाद्याविरुद्ध खोटी साक्ष द्यायची ? बाकी तुला कोणत्याही गोष्टीचं सोयर ना सुतक म्हणा—"

" अलबत !"

" बरं आहे बाबा, तुझा तूं समर्थ आहेस !! जरा जपून वाग म्हणजे झालं—" इतकं बोलून ती शेण गोळा करण्यासाठीं खालीं वांकली. जमा केलेलं शेण तिनं घरून आणलेल्या एका टोपलींत भरलं आणि ती टोपली डाव्या हाताच्या तळव्यावर धरून ती गोठ्याबाहेर पडली.

बेतू पूर्वीच घरांत येऊन कपडे करूं लागला होता. एक मळकट असं धोतर, वर गंजिफ्राक, त्यावर खाकी कपड्याचा कोट, डोक्याला घडीची काळी टोपी व पायांत वहाणा, एवढी तयारी होतांच त्यानं सोप्यावरील दिवा घालविला. उद्यां पहांटेला आपण म्हापशाला निघून

जाणार असल्याचं त्यानं आदल्या रात्रींच आपल्या घरांतील मंडळींना सुचवून ठेवलं असल्यामुळें, त्यांची आतां झोंपमोड करण्याची त्याला मुळीं गरजच नव्हती. त्यामुळें विशेष हालचाल न करितां तो तडक घराबाहेर पडला.

त्याची म्हापशाला जायची पायवाट जवळच्याच एका डोंगरमाथ्यावरून गेली होती. ती तो चढूं लागला.

आतां अंधाराचं प्रमाण बरंच कमी झालं होतं. तो घाईघाईनं पावलं टाकीत होता.

दुर्मिग भाटकाराच्या बाजूनें आज खटल्याचं काम चालविणाऱ्या वकिलाची म्हापशाला जाऊन त्याला भेट घ्यायची होती. आपण कोर्टांत द्यायच्या साक्षीची पूर्वतयारी म्हणून बेतूलाही या भेटीचा बराचसा उपयोग होणार होता. आणि ही कामगिरी सकाळीं ७ च्या आंत त्याला उरकून घ्यायची होती. तसा त्याला दुर्मिग भाटकाराचा हुकूम होता. आदल्या रात्रीं वकिलसाहेबांना उद्यां देण्यासाठीं म्हणून दुर्मिग भाटकारानें त्याच्यापाशीं पोर्तुगिजमध्यें लिहिलेली एक चिठ्ठीही पण दिली होती. ती घेऊन तो आतां पुढील तयारीकरितां चालला होता.

तो जात होता त्याच्या दोन्हीही बाजूला मोठमोठाले काजूंच्या झाडांचे मळे पसरले होते. एकाद्या तपस्व्याप्रमाणें आयुष्याचा बराच मोठा काळ खर्ची घालणारे प्रचंड असे वृक्ष आणि कुणा शास्त्रज्ञाच्या कसोटीस उतरण्याचं भाग्य न लाभल्यामुळें आंगच्या गुणांचा श्रेष्ठपणा जगाला दाखवून देण्यास असमर्थ ठरलेलीं लहानमोठीं वनस्पतियुक्त

झाडें, यांच्या तेथिल दाट अस्तित्वाचीहि पावलोंपावलीं साक्ष पटत होती. रस्त्याच्या दुतर्फा तृणांचे गालिचे पसरले होते. तेथून दूरवर पसरलेला सभोंवतालचा देखावाही भारीच नयनरम्य दिसत होता. विस्तृत अशीं हिरवींगार शेतं व मिठागरें याच्यामधून वेडीवाकडीं वळणें घेऊन गेलेल्या नद्या व कालवे, आपलं विराट स्वरूप डोळ्याआड करूं न शकणारे गगनचुंबित पर्वत, क्रिस्तांवांच्या इगर्जी व हिंदुचीं देवळं, गोमन्तक प्रांताला स्नेहांकित होऊन बसलेला अरबी समुद्र, नारळी-पोफळीच्या बागा आणि तांबड्या मातीचे रस्ते—



# कर्मापूर्वीचा पश्चाताप !

## २

वकिलसाहेबांची भेट होईपर्यंत बेतुला त्यांच्या बंगल्याच्या बल्कांवांत नाहींतरी अर्धा पाऊणतास खोळंबून रहावं लागलं. त्यावेळीं वकिलसाहेबांची दोन छोटीं मुलं बल्कांवांत खेळत होतीं. त्या मुलांच्या आंगावर उंची तऱ्हेचे कपडे आणि तेही परीटघडीचे असे होते. जवळच त्या चिमुरड्यांना संभाळण्यासाठीं एक क्रिस्तांव आया उभी होती. मधून मधून तीं पोरं बेतूकडे पहात आणि 'कोंकणो इयेंतीय' म्हणून त्याला चिडवित व मनमुराद हंसत. बेतुला त्याबद्दल वाईट वाटत नसे. उलट मुलांच्या त्या वागणूकीचं तो हंसून स्वागत करी. त्यामुळें साहजिकच मुलांना उत्तेजन मिळे. आणि त्यांच्या 'कोंकणो इयेंतीय !' 'कोंकणो इयेंतीय !' या पालुपदाला अधिकच ऊत येई. अशावेळीं

जवळची आया तसं न म्हणण्याबद्दल त्या मुलांना पुन्हां पुन्हां तंबी देई. मुलं क्षणभर उगी रहात. पुन्हां आपला लांकडी घोडा, कार्डबोर्डचा बंगला, व छोटा फुटबॉल घेऊन खेळांत गढून जात. कितीतरी वेळ हाच प्रकार चालू होता. बेतू तर एकाच ठिकाणीं उभा राहून कंटाळला होता, तोंच आंत कुणाचीं तरी पावलं वाजलीं. ते वकिलसाहेब होते. डोक्यापर्यंत हात नेऊन बेतूनं त्यांना रामराम केला. खिशांतील चिट्ठी काढून त्यांच्यासमोर धरली. त्यांनीं ती हातीं घेऊन वाचली. बेतुला घेऊन ते दुसऱ्या एका खोलींत गेले. तिथं पोपटाला पढवावं तद्वत वकिलसाहेब साक्ष कशी द्यायची हें त्याला समजावून देऊं लागले. 'त्यांत विशेष काय आहे!' अशा अविर्भावानंच बेतू दरेक प्रश्नोत्तराच्यावेळीं वकिलसाहेबांकडे पहात होता. वास्तविक खोटी साक्ष देण्याच्या कामीं बेतूनं पुढाकार घेतलेली ही त्याची पहिलीच वेळ होती. तो त्याबाबतींत अगदींच नवखा होता. पण त्याच्या त्यावेळच्या वागणुकीवरून त्याला कायद्यासंबंधीं बरंच समजतं अशी ऐट आणण्याचा तो प्रयत्न करी.

कांहीं वेळानं बेतू वकिलसाहेबांच्या बंगल्यावरून बाहेर पडला.

सूर्याची किरणं शहरभर फांकली होती.

पांच मिनिटांचा रस्ता पायांखालीं तुडवून गेल्यावर बेतुला एक चहाचं हॉटेल दिसलं. तो आंत शिरला. टेबलापाशीं असलेल्या एका खुर्चीवर जाऊन बसला. तोंच खांद्यावर मळकट फडकं टाकलेला एक पोऱ्या ऑर्डर घेण्यासाठीं तिथं आला. त्यानं त्याला पातळ भाजी व पाव आणायला सांगितला. जिन्नस टेबलावर येतांच त्यानं त्यावर ताव मारायलाही सुरवात केली. लगेच एक कप चहाची ऑर्डर सोडली.

हॉटेलांतील घड्याळांत नवाचे ठोके पडले.

अजून कोर्ट उघडून रीतसर कामाला सुरवात व्हायला दोन तासांचा अवधी होता.

बिल चुकतं करून बेतू त्याचवेळीं हॉटेल बाहेर पडला.

आतां कुठं जायचं हा त्याच्यापुढें प्रश्न होता. पण त्याबद्दल त्याला फारसा विचार करावा लागला नाहीं. कारण खोरलीला ( म्हापसें शहरांतील एक भाग ) जायचं ठरवून त्या दिशेनं त्यानं आपलीं पावलं टाकायलाही तितक्यांत सुरवात केली.

प्रेमा नांवाची एक भावीण खोरलीला रहात होती. तिचा नामदेव नांवाचा एक भाऊ ड्रायव्हर होता. त्याचा आणि बेतूचा फार परिचय. बेतू आतां खोरलीला जात होता तोही त्यालाच भेटण्यासाठीं—

नामदेवाचा निरोप घेऊन बेतू परत रस्त्यावर आला. त्यावेळीं उणें-पुरे १०॥ वाजले होते.

कोर्टांत येईपर्यंत बेतूला ११ वाजले.

नुकताच जुवीज आपल्या खुर्चीवर येऊन बसला होता. काळे झगे घातलेले कांहीं वकिल समोरच्या खुर्च्यांवर जुवीज यायच्या अगोदरच बसून होते. कांहीं नुकतेच येत होते. पोंबुर्पेचा दुर्मिग भाटकार व त्याचा वकिल एका कोपऱ्यांत उभे राहून कांहीतरी कानगोष्टी करीत होते. कोर्टांतील पहिल्या खटल्याला सुरवात झाली होती—

कोर्टांतील एका बांकड्यावर एक सुंदर अशी ख्रिश्चन मुलगी आपल्या बापाच्या शेजारीं बसली होती. जिच्यावर आशक होऊन बलत्कार

केल्यामुळे दुर्मिग भाटकाराला आज कोर्टात उभं रहावं लागलं होतं, तीच ही मुलगी—

वेळ भराभर निघून जात होता. मध्यंतरी कोर्ट उठलं. पुन्हां बसलं. चार वाजले. शेवटीं फिर्यादीचा वकिल कंटाळून त्या मुलीच्या बापाशीं येऊन म्हणाला—"आज आपली केस उभी राहिल असं वाटत नाही!"

आणि दुर्मिग भाटकारालाही पण त्याच्या वकिलानं तेंच सांगितलं.

केसीची पुढील तारीख दोन्हीही वकिलांच्या संमतीनें कोर्टामार्फत अखेर मुक्रर करण्यांत आली. आणि त्या खटल्यांत संबंध येणारे वकिलद्वय व फिर्यादी–आरोपी यांच्या बाजूची सर्व मंडळी साडेचार वाजायच्या आंतच कोर्टाबाहेर पडली—

सकाळीं ज्या डोंगरमाथ्यावरून बेतू एकोशीहून म्हापशाला आला होता त्याच मार्गानें म्हापशाहून आतां तो एकोशीला जात होता.

त्याच्या खिशांत चणे होते. ते आतां रस्त्यानं जातांना तो खात सुटला होता.

—मोठा वस्ताद प्राणि! सहसा म्हणून कधीं खरं बोलायचा नाहीं! कुणाशीं कधीं सरळ व्यवहार करायचा नाहीं! कधीं घरांत नीट असायचा नाहीं! कुठंतरीं सारख्या भानगडी करीत सुटायचा! रात्रंदिवस या ना त्या कामांत गढलेला! स्वस्थ म्हणून कधीं बसायचा नाहीं! आणि इतकं करूनही तो जन्माचा भिकारी तो भिकारीच—

त्याचं मुळ नांव रवळू. पण कां कोण जाणे गांवचे बहुतेक लोक त्याला बेतू म्हणूनच हांक मारीत. त्याच नांवानें त्याला ओळखीत. त्याचीं

घरचीं माणसंही त्याला हांक मारतांना त्याच नांवाचा उपयोग करीत. बेतूचं वयही कांहीं मोठं नव्हतं ! अवघीं २८ वर्षे ! त्याचं अद्यापि लग्न झालं नव्हतं ! त्याला कारण होतं ! तो दुर्व्यसनांचा मूर्तिमंत पुतळा होता ! त्याला दारूचं व्यसन होतं ! जुगार म्हटला कीं तो झोंपेंतून जागा होई ! बाहेरख्याली करण्यांतही त्याची प्रसिद्धी होती ! वेळप्रसंगीं तो चोऱ्याही करी ! भोळ्याबापड्या बायका पाहून खोटे दागिने खरे म्हणून त्यांच्याकडे गहाण टाकून त्यांना लुबाडी ! एकादी परस्त्री रस्त्यांतून जातांना जवळ दुसरं कुणी नाहीं असं पाहून तिची हटकून थट्टा करी. एकादा अश्लिल शब्द तोंडांतून उच्चारून वांकड्या नजरेनें तिच्याकडे पाही. कधीं कुणाकडून हातापाया पडून चार आण्याचे पैसे उसने घेतले, तर ते परत करण्याची त्याला कधींच सुबुद्धी होत नसे ! अशा एक ना हजारों लटपटी ! एकंदरींत त्याचं आयुष्य हें असं होतं—

त्याला घरांत एक पैसाही कमवून आणावा लागत नसे. कारण त्याची विधवा आई गांवच्या गांवांत मासळी विकून आपला व आपणावर तूर्त अवलंबून असलेल्या दोन मुलांचा उदरनिर्वाह करी. तिला एकंदर तीन मुलं होतीं. सर्वांत मोठी तुळशी. तिचं लग्न होऊन आज जवळ जवळ १६ वर्षे झालीं होतीं. तिला कायसुवला दिली होती. तिच्या पाठचा बेतू. गीता ही तिची सर्वांत धाकटी मुलगी.

बेतूचं आणि त्याच्या आईचं घरांत मुळींच पटत नसे. पुष्कळदां क्षुल्लक कारणांवरून तीं दोघं भांडत. कित्येक दिवस आणि कित्येक महिने एका शब्दानंही एकमेकांशीं बोलत नसत. आणि या भांडणाचं मूळ कारण म्हणजे बेतूचा बदफैली स्वभाव, त्याचं लांछनयुक्त वर्तन—

अर्धीअधिक वाट तुडवून बेतू आतां डोंगराच्या मध्य सीमेवर येऊन टेपला होता. उन्हाचा त्रास आतां बराच कमी होऊं लागला होता. झपाझप पावलं टाकीत तो पुढील मार्ग आक्रमूं लागला—

कांहीं पुढं गेल्यावर त्यानं एकाएकीं किंकाळी फोडली. धडकन् तो जमिनीवर बसला. त्याचं ओरडणं सुरूच होतं. आपला डावा पाय दोन्हीं हातांनीं घट्ट धरून तो बसला होता. त्याचे हातपाय कापूं लागले होते. छाती धडधडूं लागली होती.

त्यानं परिस्थिति ओळखली. आपल्या पायाला कुणीतरी चावलं आहे एवढं त्यानं ओळखलं. तो बहुतेक साप असावा याबद्दल त्याला संशय राहिला नाहीं. कारण त्याच्या आंगांत आतां विष भिनत होतं—

आणि त्याला कल्पना आली ती चुकीचीही पण नव्हती. त्याच्या पायाला चावा घेणारा प्राणि सापच होता. तो क्षणांत दडून बसला होता. रस्त्यांतून जातांना बेतूला किंचित आडवाटेनं जाण्याची दुर्बुद्धी आठवली आणि त्याचा डावा पाय नेमकाच त्या सापावर जाऊन पडला. मग काय? सापानें जे करायचं तेंच केलं! दंश करून बेतूच्या डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच तो साप तृणांतल्या तृणांत अदृश्य झाला होता.

एकाएकीं बेतूची धडपड बंद झाली. विषबाधा झालेला मनुष्य आणखी कितीवेळ तग धरणार? अखेर शुद्धी जाऊन तो जमिनीवर कोलमडला—

कर्मधर्मसंयोगानें कांहीं वेळानं तिथून दोन माणसं जाऊं लागलीं. त्यापैकीं एकाची दृष्टि बेतूकडे गेली. प्रसंग आणीबाणीचा होता. त्या दोघांपैकीं स्त्री होती ती सोबतच्या पुरुषाला म्हणाली—"हा तर एकोशीच्या त्या जायुचा मुलगा! मघाशीं म्हापशेंच्या कोर्टांत मी याला पाहिला होता! कसा अगदीं काळाठिक्कर पडला आहे नाहीं? याला बहुतेक सर्पदंश झाला असला पाहिजे! तुम्हांला नाहीं तसं वाटत? छे! आतां कसं करावं? काळीज अजून हलतं आहे! योग्यवेळीं उपचार झाले तर बिचारा जगेल सुद्धां! बाबा विचार कसला करता? याला इथून कसंही करून आपणाला हालविलंच पाहिजे! आपण याला जीवदान दिलं तर देवाच्या घरीं आम्हीं पुण्यवंत ठरूं! नका आतां विचार करूं! मी सांगते तसं करा! याला पाठीवर उचलून घ्या! येथून आपलं गांव आतां दूर नाहीं! घरीं नेऊन बिचाऱ्याला आपण कांहीं तरी उपचार करूं—"

क्षणांत त्या पुरुष व्यक्तीनं त्याला पाठीवर मारलं. आणि धापा टाकीत तो चालूं लागला. स्त्री होती ती त्याच्या मागून जाऊं लागली.

बेतूनें डोळे उघडले. त्याच्या भोंवतालीं ३०।४० माणसांचा घोळका जमला होता. त्याच्या जवळ तीन माणसं बसलीं होतीं. एक विष उतरविणारा मुसलमान मांत्रिक! दुसरा एक खिश्चन म्हातारा व त्याची मुलगी! बेतूनं त्या मुलीकडे पाहिलं! त्याच्या अंतःकरणाच्या एका कोपऱ्यांत कुणीतरी चिमटा घेतल्याचा त्यास भास झाला! कळवळून त्यानं मनाशीं म्हटलं—"याच पोरीविरुद्ध आज म्हापशेंच्या कोर्टांत मी खोटी साक्ष देणार होतों!!"

# नाटकावर पडदा

## ३

पोंबुर्पेच्या झरीच्या दिशेनं तोंड करून दोन माणसं चाललीं होतीं. वेळ संध्याकाळची होती. ऊन निघून गेलं होतं.

दुर्मिंग भाटकार चार पावलांच्या अंतरानं पुढें चालला होता. त्याच्या डाव्या हातीं आंगाला लावायचा सुगंधी साबण, टॉवेल, व स्नानासाठीं लागणारें इतर साहित्य होतं. तोंडात तंबाकूचा पाईप होता. उजव्या हातीं त्याची तपकिरी रंगाची आवडती काठी होती. ती मधून मधून जमिनीला टेकीत तो चालला होता. त्याच्यामागून बेतू जात होता. फक्त पावसाळा तेवढा खेरीज केल्यास आंघोळीचा कार्यक्रम गांवच्या झरीवर जाऊन उरकण्याची दुर्मिंग भाटकाराची नेहमींची वहिवाट होती. तो बहुतेक संध्याकाळच्याच वेळीं स्नान करी. आतां तो झरीवर चालला होता तोहि याच निमित्तानं.

पांचच मिनिटांपूर्वी कांहीं महत्वाच्या बाबतींत दुर्मिंग भाटकाराची भेट घेण्यासाठीं म्हणून बेतू मुद्दाम एकोशीहून पोंबुर्पेला आला होता. तो आला तेव्हां दुर्मिंग भाटकार झरीवर निघायच्या घाईत होता. साहजिकच बेतुलाही बोलत बोलत आपणाबरोबर चालायला त्यानं सांगितलं. रस्त्यांत त्यांची बोलणीं सुरूं झालीं.

बेतू म्हणाला—" ईश्वराची कृपा म्हणून बचावलों ! "

" होय, मी ऐकलं तें ! म्हापशाहून येतांना तुला वाटेत साप चावला म्हणे—"

" तरी बरं झालं ! मागून सांतान आणि त्याची मुलगी कार्मिन येत होती. सुदैवानं बेशुद्धावस्थेंत मी त्या पोरीच्या दृष्टीस पडलों ! तिनं मला ओळखलं ! लगेच सांताननं मला पाठीवर मारून आपल्या पोंबुर्पेच्या घरीं आणलं ! त्यांना शक्य होती त्या मार्गानें उपाय योजना करून मला जीवदान दिलं ! भाटकारा, त्यांचे हे उपकार विसरणं मला कदापिही शक्य नाहीं ! आतां मी तुमच्याकडे आलों तोहि—"

" बोल, तुला काय बोलायचं असेल तें बोल—"

" भाटकारा, माझ्यापुढें मोठाच पेंच येऊन पडलेला आहे ! एकतर या बापलेकीविरुद्ध खोटी साक्ष देण्याचं मी तुम्हाला अगोदरच कबूल करून चुकलों आहे ! बरं तसं करावं तर तीन दिवसापूर्वी ज्या लोकांनीं आपल्या वर्तनानं मला जन्माचं उपकारी करून ठेवलं त्यांची फेड मला उद्यां अपकाराने करावी लागेल ! या बाबतींत मी एक चांगला विचार करून आलों आहे ! हा तुम्हांला पसंत पडतो तर—"

" सांग तर खरा—"

" मी तुम्हांला असं विचारतो कीं हें प्रकरण कोर्टानं निकालांत काढण्यापूर्वी त्याचा आपण आपापसांतच निकाल लावला तर ? "

" पण सांतान त्याला तयार होईल असं वाटत नाहीं ! तुला काय वाटतं, मी या बाबतींत पूर्वी प्रयत्न केला नाहीं म्हणून ? छे ! पुष्कळ केला. तरीहि सांतान कोर्टांत गेलाच—"

"—पण आज सकाळीं त्याच्याशीं माझ्या झालेल्या संभाषणावरून कदाचित तुमच्यावरचा आरोप कोर्टातर्फे मागं घ्यायला सांतानची हरकत नसावी असं दिसतं ! मात्र त्यासाठीं तुम्हांला कांहींतरी मोठी रक्कम सांतानला द्यावी लागेल ! याला तयारी असल्यास या प्रकरणावर शेवटचा पडदा टाकायची मी माझ्याकडून होताहोईतों शिकस्त करीन—"

हें बोलणं चालू असतांना ते दोघे एका नारळीच्या झाडाखालीं उभे होते. तेथून एका उल्यावर झर होती.

दुमिंग भाटकाराच्या चेहऱ्यावर हास्य चमकलं. तो डोकं खाजविल्यासारखं करून म्हणाला—" तूं सांतानलाच यासंबंधीं विचारून पहा ना ! त्यानं कबूल केलंच तर अब्रूपेक्षां पैसे मला मोठे नाहींत ! जा तूं आतां ! उद्यां मला येऊन भेट ! कदाचित नाटकाचा शेवट गोड झालाच तर तुझंही तोंड गोड केल्याशिवाय मी रहाणार नाहीं—"

बेतू आतां तिथं कसला थांबतोय ! दुमिंग भाटकाराचा निरोप घेऊन तो जो तिथून निघाला तो थेट सांतानाच्या घरीं—

बेतू गेला तेव्हां घराबाहेरच्या अंगणांत सांतान कोयत्यानं नारळ सोलीत बसला होता. शेजारींच एक पेरूचं झाड होतं. त्याच्याखालीं

सांतानची मुलगी कार्मिन उभी होती. वर एक मुलगा पेरू काढण्यासाठीं चढला होता. त्यानं वरून खालीं टाकलेले पेरू भराभर गोळा करून कार्मिन आपल्या घागऱ्याच्या ओटींत भरत होती.

बेतूनं आपण कां आलों याविषयीं तितक्यांत सांतानशीं खुलासा केला.

तेव्हां म्हातारा त्याला म्हणाला—" जरा थांब हं बेतू! मी हा एवढा नारळ सोलून घेतों, म्हणजे मग बसूं आपण वाटेल तितक्या गप्पा ठोकीत!"

" बरं आहे! सावकाश होऊं द्या तुमचं—" इतकं बोलून बेतू कार्मिन उभी होती त्या पेरूच्या झाडापाशीं गेला.

क्षणांत त्यानं कार्मिनला म्हटलं—" एकटीच खाणार वाटतं तूं सगळे पेरू?"

बेतू तसं का म्हणाला हें कार्मिननं तात्काळ ओळखलं. तिनं लगेच दोन पेरू काढून बेतूपुढें धरले; व चेहऱ्यावर हास्य पसरवून खेळकरपणानें विचारलं—" बरस?"

बेतूनें ते दोन्हीही पेरू हातीं घेतले. त्यापैकीं एकाचा घांस घेतला, डोळे किंचित् मोठे करून कार्मिनकडे पाहिलं, आणि म्हटलं—" किती चवदार पेरू आहे!"

तोंच सांताननं त्याला सोप्यावरून हांक मारली. बेतू लगबगीनें तिथं गेला. दोघेही कानगोष्टी करीत बसले. मघाशीं दुर्मिंग भाटकाराशीं झालेलीं आपलीं बोलणीं बेतूनं सांतानच्या कानावर घातलीं. तो विचारांत पडला—

दुर्मिंग भाटकारानं विचारलेल्या मघांच्या त्या वाक्याची बेतुला तितक्यांत आठवण झाली. तो म्हणाला होता—"अब्रूपेक्षां पैसे मला मोठे नाहींत !"

सांताननं त्याच्या उलट उत्तर दिलं. तो म्हणाला—"मी पडलों गरीब ! मलाही अब्रूची चाड आहे ! पण त्याहून पैसा मला अधिक मोठा आहे—"

—परिस्थितीच्या चौकटांतील स्वभाव चित्रांचे किती भिन्न नमुने हे ! !



# जुगारापायीं

## ४

डाव्या हातीं कात्री व उजव्या हातीं फणी अशा थाटांत दामू न्हावी छोट्या मुरारीचे केंस कापण्यांत गढून गेला होता. त्यानं खिशांतून काढून दिलेली फुटकी आरशी मुरारी हातांत घेऊन बसला होता. मधून मधून तिच्यांत तोंड पहाण्याची मुरारीला लहर येई. साहजिकच त्याच्या या चाळ्यामुळें दामूला केंस कापताना थोडाबहुत त्रास सहन करावा लागे. एकादेवेळीं दामू त्याच्यावर चिडून डोकं नीट धरायला त्याला सांगे. पण मुरारीची आरशांत पहाण्याची उत्सुकता कांहीं त्यामुळें कमी होत नसे.

मुरारीचं वय अवघं ४ वर्षांचं होतं. त्यानं अंगांत हाततोटकं खमीस घातलं होतं. खालीं लंगोट लावलेली नव्हती त्यामुळें तो नागडा होता.

त्याची आई आंत रांधपघरांत पेज व बरोबर तोंडी लावण्यासाठीं बुराट्यांचे धबधबीत बनविण्यांत गढली होती. बाप शेजारच्या घरीं लग्नाच्या मंडपाचं राहिलेलं अपुरं काम पुरें करण्यांत आपल्या सहकाऱ्यां-निशीं झटत होता.

त्याचवेळीं सोप्यावर कुणाचीं तरी पावलं वाजलीं. दामूनें पकडून ठेवल्यामुळें मुरारीची मान खालीं होती, ती त्यानें कोण आलं आहे हें पहाण्यासाठीं तितक्यांत वर केली. आणि समोरच्या माणसाला पाहून तो ओरडला—"मामा ऽऽ मामा ऽऽऽ—"

मुरारीच्या त्या ओरडण्यानें दामूचेंही लक्ष त्या माणसाकडे गेलं. तो त्याच्याकडे विस्मयाच्या दृष्टीनें पहात म्हणाला—"कोण बेतू का? वा! तुला तर अगदीं शंभर वर्षे आयुष्य आहे! नुकतंच मी तुझ्याविषयीं तुळशीला विचारलं होतं. म्हटलं, उद्यां शेजारच्या घरीं तुझ्या मित्राचें लग्न आहे! तेव्हां तूं नक्की येशीलच असं मला वाटलं होतं. पण तुळशी म्हणाली—"त्याचं काय! वाऱ्यावरचा पाचोळा तो! कदाचित येईल, कदाचित येणारही नाहीं! पांच मिनिटंसुद्धां झालीं नाहींत एवढं बोलून—"

दामू एवढं बोलतो आहे तो बाहेर मामा आल्याची वर्दी देण्यासाठीं केंस कापायचे अर्धवटच सोडून मुरारी आंत आपल्या आईपाशीं गेला सुद्धां. तेवढ्यांत सोप्यावर बसतां बसतां बेतू दामूला सांगू लागला—"खरं विचारशील तर माझ्या मनांतून लग्नाला येण्याचं मुळीं नव्हतंच! माझा मानस आई व गीता यांनीं मिळून लग्नाला जावं असा होता. पण तीं येण्याच्या परिस्थितींत नव्हतीं! कारण, आज दोन महिने झाले, गीतेला

बारीक ताप येतोय ! शिवोलीच्या वैद्याचं औषध सुरू आहे तूर्त तिला ! अशा स्थितींत तिला घरीं सोडून आई एकटी कशी लग्नाला येणार ? अखेर मींच लग्नाला जावं असं तिचं मत पडलं. प्रथम मी त्याला हरकत घेतली. पण ती म्हणाली—' तसं करणं बरं होणार नाहीं ! आपणा-कडून कुणीच नाहीं गेलं लग्नाला, तर कुष्टाच्या घरची मंडळी आमच्यावर कायमची रुसून बसतील ! शिवाय कुष्टा तुझा दोस्त ! त्याच्या लग्नाला तूं न गेलास तर त्याला केवढं वाईट वाटेल ! लोक काय म्हणतील ?— एका दृष्टीनें तिचें तें म्हणणं अनाठायीं नव्हतं. शेवटीं विचार करकर केला आणि आलों झालं—"

इतक्यांत तुळशीचा हात धरून मुरारी बाहेर आला. बेतुकडे दृष्टि जातांच तुळशीच्या चेहऱ्यावर उत्साह व हास्य यांची संमिश्र भावना तळपली. तिचा ऊर आनंदानं भरून आला. तिनं घरच्या मंडळीचं कुशल विचारलं. जिव्हाळ्यानें एकेका गोष्टीचा खुलासा करून घेतला. गीतेला बारीक ताप येतोय हे ऐकून मात्र तिचं चेहऱ्यावरील क्षणापूर्वीचं हास्य कुठल्या कुठं मावळलं. ती चिंताग्रस्त बनली. ही बातमी तत्पूर्वी आपणाला पत्रानं देखील कळविली नाहीं म्हणून भावाला व आपल्या आईला तिनं दोष दिला. त्यांची त्याबद्दल शब्दानं कानउघाडणी करण्यासही ती कचरली नाहीं.

बेतू म्हणाला—" तूं घाबरशील म्हणून तुला कळविलं नाहीं—"

हें बोलत असतांना मुरारी तो बसल्या ठिकाणीं आल्याने बेतूनं त्याला एकदम आपणाकडे उचलून घेतलं. आणि सोबत आणलेलें एक कागदाचें पुडकं काढून ते मुरारीच्या स्वाधीन केलं. मुरारी ' खाऊ खाऊ '

म्हणून नाचूं लागला. पण त्याच्या हातांतील ते पुडकं हिसकावून घेऊन तुळशीनं त्या बालकाच्या आनंदांत क्षणांत विरजण घातलं. ती म्हणाली —" हूँ हूँ! इतक्यांत नाहीं खायचं! आधीं केस कापून घे! आणि नंतर खाऊ—"

मुरारी रडूं लागला. ती भेट आपली आहे. ज्याअर्थी मामानं ती आपणाला दिली आहे, त्याअर्थी ह्या पुडक्यावर आपला एकट्याचाच हक्क आहे अशा अविर्भावानें तो पोर तदप्रसंगीं वागूं लागला. हातपाय बडवूं लागला. आकांत करूं लागला.

पण तुळशी कसली हेकेखोर! तिनं त्याच्या त्या बालहट्टाला मुळींच दाद दिली नाहीं! उलट तो ऐकत नाहीं असं पाहून तिनं संतापानें त्याच्या पाठीवर एक थप्पड देखील लगावली! त्यामुळें तो अधिकच रडूं लागला. तुळशीला तें सहन झालं नाहीं. ती अधिकच चिडली. क्षणांत त्या चिमुरडयाचा डावा हात त्वेषाने पकडून तिनं त्याला दामूपुढें नेऊन बसविला. आणि दरडावणीच्या स्वरांत विचारलें—"रडशील पुन्हां?"

मुरारीचा रडण्याचा वेग हळुहळू कमी होऊं लागला. दामूनें त्याला तशाच स्थितींत आपल्याजवळ ओढलं. त्याचं डोकं हातीं घेतलं. आणि पुन्हां केस कापायला सुरवात केली.

तोंच तुळशी घेतूला आंत येण्याविषयीं सांगून रांधपघरांत निघून गेली. तिच्यामागून घेतू आंत गेला.

तीं दोघं बोलत बसलीं.

थोड्याच वेळांत तुळशीनें त्याला कपडे उतरून पेज जेवण्याबद्दल सुचविलं. त्यालाही कडकडून भूक लागली होती. त्यानें लगेच कपडे उतरून भिंतीवरील एका खुंटीला नेऊन टांगले. तो पाटावर जाऊन बसला. तुळशीनें एका पितळींत त्याच्यासाठीं पेज वाढली. दुसऱ्या एका एका बशींत बुरांट्याचें धबधबीत वाढलें. बेतूनें पेजेवर ताव मारायला सुरवात केली.

जवळजवळ अर्ध्या तासानंतर बेतू लवकर येतो असं सांगून घराबाहेर पडला. तो दोनप्रहरच्या जेवणाला परत आला नाहीं. दोन वाजेपर्यंत तुळशी त्याची वाट पाहून पाहून थकली. पण बेतूचा पत्ता नाहीं! तो कुठं गेला होता हें समजायलाही तिला मार्ग नव्हता. बेतू आला म्हणून तिला आज केवढा आनंद झाला होता. त्याच्यासाठीं तिनं आज जेवण सुद्धां किती सुंदर बनविलं होतं. मोरीची सागोती केली होती. त्याबरोबर खायला पोळे बनविले होते. तिसऱ्यांचीं कालवं काढून त्याचं कालवण बनविलं होतं. मुळ्याची भाजी केली होती.

बिचारी बेतू आला नाहीं असं पाहून मनाशीं चरफडली. कंटाळून अखेर स्वत: जेवायला गेली. कसेबसे एकदोन घांस तिनें खाल्ले.

रात्र झाली होती.

बेतू थकून घरीं आला होता. त्याचे डोळे खोल गेले होते. चेहरा काळवंडला होता. तोंडाला काजूच्या फेणयेची घाण सुटली होती.

येतांच तूं दोनप्रहरीं जेवायला का आला नाहींस, कुठें गेला होतास, इतकं कसलं काम पडलं तुला अकस्मात् वगैरे प्रश्नांचा त्याच्यावर तुळशी-कडून भडीमार होऊं लागला. त्यानं त्या प्रश्नांची वेडीवांकडी उत्तरें दिलीं.

एकाद्या लहान मुलाचं देखील त्या उत्तरानें समाधान झालं नसतं. मग तुळशीचं कसं व्हावं ? ती गप्प राहिली. बेतूच्या बोलण्यांत फारसा सत्यांश नाहीं हें उमजूनही ती त्या बाबतींत अधिक खोलांत शिरली नाहीं.

तिनं त्याला जेवण्यासाठीं आंत बोलावलं. कपडे उतरून तो रांधपघरांत गेला. पाटावर जाऊन बसला. तुळशी त्याला वाढूं लागली. तो जेवूं लागला. मधून मधून तुळशी त्याच्या चेहऱ्याकडे पहात होती. बेतू कसल्यातरी विवंचनेंत आहे एवढं तिनं ओळखलं. पण त्याबद्दल त्याला एक शब्दानंही विचारलं नाहीं—

जेवणं आटोपतांच तुळशीनं सोप्यावर एक अंथरुण सोडून बेतूच्या निजण्याची तयारी केली. बेतू त्यावर विडी शिलगावित बसला. तोंच त्याचा भाचा मुरारी त्याच्याजवळ येऊन म्हणाला—"मामा कहाणी सांगा ना !"

"लबाड ! म्हणे कहाणी सांगा ! झोंप नाहीं वाटतं येत !" एवढं बोलत असतांना त्यानें भाच्याला वर उचलून सोप्यावर बसविलं. त्याला लाडानें कुरवाळलं आणि त्याच्यासारखे बोबडे बोल काढून म्हटलं— "सांगतो हं कहाणी !"

कुणीतरी गुदगुदल्या कराव्या तद्वत मुरारी उत्साहाच्या भरांत हंसूं लागला. टाळ्या पिटूं लागला. म्हणाला—"कुठची सांगाल ?"

"—म्हातारा आणि म्हातारी—"

"हुं हुं !" तो नापसंती दर्शवित उद्गारला.

"मग ? राजा आणि राणी —"

"नको ! कोल्हा आणि कोल्हीची सांगा—"

"ठीक !" असं म्हणून बेतूनें कहाणी सांगायला सुरवात केली.

जवळ दुसरं कोणी नव्हतं.

रात्र अंधारी होती. वारा सुटला होता. माडांचीं चुडतं हलून सळसळ असा आवाज होत होता. रस्त्यावर एक कुत्रं भुंकत होतं.

तुळशी मागीलदारीं भांडी घांसत होती.

मुरारीचा वडील शेजारच्या एका घरीं कुणीतरी घूमट वाजवीत होता तें ऐकण्यासाठीं गेला होता.

बेतुचें कहाणी सांगण्याचं काम तसंच सुरू होतं. पण त्याच्या मनांत निराळेच विचार चालू होते.

त्याची दृष्टि मुरारीच्या गळ्यांतील सोन्याच्या सांखळीकडे लागली होती. तो मनाशीं म्हणत होता—"कमींतकमीं १७।१८ रुपये येतील विकून !"

त्याचं एक मन म्हणत होतं—"छे ! हें बरं नाहीं ! मुरारी कुणी परका नाहीं ! तो आपलाच भाचा आहे !" लगेच त्याचं दुसरं मन म्हणे—"असेना का ! नातींगोतीं सब झूट आहे ! प्रसंग पडला कीं कुणी कुणाचं नसतं !"

ही विचारसरणी त्याला शिवली ती तशाच एका महत्वाच्या प्रसंगामुळें.

एकोशीहून कांयसुवला निघतांना कुष्टाला त्याच्या लग्नांत अहेर म्हणून देण्यासाठीं बेतुजवळ अर्धे पत्रन व त्याला वाटखर्चास्तव दोन रुपये एवढी रक्कम त्याच्या आईनं दिली होती.

त्यापैकीं एकोशीहून कांयसुवला येईपर्यंत बेतूला १२ आणे खर्च झाले होते. बाकीची रक्कम त्याच्या खिशांत होती. ती घेऊन सकाळीं पेज

जेवल्यानंतर तो बहिणीकडून बाहेर पडला होता. रस्त्यांत त्याला एक ओळखीचा इसम भेटला. तो एक जुगारी होता. बेतूची आणि त्याची फार जुनी मैत्री होती. त्याच्याकडूनच गांवांत एका ठिकाणीं जुगार चालू असल्याची बेतूला माहिती मिळाली. मग काय विचारतां? ते दोघेही मित्र लगेच जुगाराच्या त्या अड्ड्याकडे वळले. एका माडीवर हा अड्डा पडला होता. ५।६ माणसं आपापल्या पायाजवळ नोटांची पुडकीं, रुपये व इतर चिल्लर घेऊन बसले होते. त्यापैकीं एकाच्या हातीं पत्ते होते. 'तोप' 'मायज' 'बायर' 'बितर' वगैरे शब्दांची तिथं जमलेल्या जुगाऱ्यांकडून नुसती उधळपट्टी होत होती. तिथंच आतां बेतू आपल्या मित्रासह जाऊन थडकला होता. कुष्टाला लग्नांत अहेर म्हणून देण्यासाठीं त्याच्या आईनं त्याच्यापाशीं दिलेलं अर्धें पवन त्यानं आतां खिशांतून बाहेर काढलं. त्या जुगाऱ्यांत एक इसम सोनार होता. त्याला त्यानं पवनाचा भाव विचारला. त्याला उत्तर मिळालं—"सतरा रुपये!"

त्याच सोनारानं बेतूपासून ते अर्धें पवन ८॥ रुपये देऊन विकत घेतलं.

बेतू रुपये जवळ घेऊन खेळायला बसला.

संध्याकाळ झाली तरी तो खेळत होता. जेवण, खाण, कशावर म्हणून त्याचं लक्ष नव्हतं. तो खेळांत नुसता रंगून गेला होता. शें सव्वाशें रुपये त्याला त्या खेळांत मिळाले. तरी त्याला तिथून निघण्याची इच्छा होईना—

दिवे लागले.

—जुगारच तो—

पारडं फिरलं! घटकेपूर्वी उत्साही दिसणारे चेहरे आतां खिन्न दिसूं लागले! बेतूजवळील रक्कमही हळुहळू कमी होऊं लागली! तो भडकला होता—

डाव त्याच्या हातीं आला होता. त्यानं पत्ते पिसले. पानं खालीं ठेवली. कापणी झाली. 'पांच रुपये एक्का!' बेतूनें पत्ते उचलून हातीं घेतले. 'मायज' एक हात नोटांचं पुडकं पुढं करीत आला. 'तोप' बेतू बोलला. त्यानं वांटणी सुरू केली. एक्का बाहेर पडला. बेतुची ती धडपड अखेरची ठरली. कारण, नफ्याबरोबर तो आतां मुद्दलही गमावून बसला होता. विष खायला देखील त्याच्याकडे दमडी राहिली नव्हती. रिकाम्या खिशानं अखेर त्यानं अड्डा सोडला होता. तिथून निघाल्यावर आपल्या त्या मित्राच्या खर्चानें एका गुत्यावर काजूची फेणी पिऊन तडक तो बहिणीकडे आला होता.

जेवण उरकून तो सोप्यावरील आपल्या अंथरूणावर येऊन बसल्यावर "कुष्टाला उद्यां लग्नांत अहेर कुठून द्यावा?" हाच प्रश्न तो आपल्या मनाला पुन्हां पुन्हां विचारीत होता. त्याला उत्तर मिळत नव्हतं. अहेर न द्यावा तर लग्नाला जाणं अशक्य! किंवा लग्नाला जाऊन अहेर न द्यावा तरीही पंचाइत! बरं, तुळशीकडून तेवढे पैसे उसने घ्यावे म्हटले, तर तेही मिळण्याची त्याला शक्यता दिसेना! कारण त्यापूर्वी कितीदांतरी तिच्यापासून त्याने अशाच निरनिराळ्या कारणावरून उसनवट पैसे घेतले होते. त्यांतील एक पैसुद्धां त्यानं तिला परत केली नव्हती. त्यामुळं नवऱ्याकडून तिला अनेक दुरुत्तरें देखील सहन करावीं लागलीं

होतीं. हा सारा इतिहास तो जाणत असल्यामुळें इच्छा होऊनही तुळ-शीशीं पैसे मागायला त्याचं मन धजलं नसतं. तो मोठ्या फिकीरींत पडला होता.

तोंच 'कहाणी सांगा' म्हणून मुरारी त्याच्याजवळ आला. आणि कहाणी सांगता सांगता त्याच्या मनांत कुविचारांना भरती आली. तो मनाशीं म्हणत होता—"आतां कांहीं नाहीं! बाळंतीणीची सुटका करण्यासाठीं आडवं आलेलं मूल कापावं लागतं—त्यांतलाच हा प्रकार! प्रसंग निभावून न्यायचा असेल, तर ही संधि वायां जाऊं देतां कामा नये! सकाळीं उठून गुपचूप म्हापशाला जावं! एकाद्या सराफाला ही सांखळी विकून टाकावी! आणि तिच्या मोबदल्यांत अर्धे पवन व बाकीची रोकड घेऊन पुन्हां कांयसुवला येऊन लग्नाला उपस्थित रहावं! या गांवांत कांहीं ही सांखळी विकण्याची सोय नाहीं! कारण त्यामुळें आपली चोरी उघडकीस येण्याचा संभव आहे!"

अखेर त्या बाजूनं त्यानं प्रयत्न करण्याचं ठरविलं.

आणि योगायोग तरी किती विचित्र!

बेतू कहाणीं सांगत असतांना मुरारी एकाएकीं डुलक्या घेऊं लागला. ती संधी साधून बेतूने त्याच्या गळ्यांतील सांखळी मोठ्या शिताफीनें उतरविली. नंतर त्यानं भाच्याला हळूच चिमटा घेत म्हटलं—"कायरे गुलामा! झोंपतोस कीं कहाणी ऐकतोस?'

तो चिमुरडा तरी कसला वस्ताद! त्यानं डोळे चोळीतच उत्तर दिलं, "झोंप यावी अशीच तुमची कहाणी आहे! हिला कहाणी म्हणतात होय? माझे बाबा व आई किती चांगल्या कहाण्या सांगतात! मला फार

फार आवडतात त्या ! तुम्हाला मुळीं कहाणी सांगतांच येत नाहीं—" इतकं बोलून तो झोंपायला म्हणून आपणच होऊन आंत जाऊं लागला. तोंच मुरारीचा वडील गंगाराम वाऱ्यासारखा बाहेरून घरांत शिरला. तो भलताच संतापलेला दिसत होता. आकान्डतांडव करीत तो बेतूसमोर येऊन उभा राहिला. त्यानं मेव्हण्याची एकाएकीं झडती घ्यायला सुरवात केली. मुरारीला बोलावून घेतलं. आणि त्याच्या गळयाकडे बोट दाखवीत गंगाराम म्हणाला—"हे असले धंदे करतोस होय ? चोर ! कुठं आहे सांखळी ? आण ती इकडे ! दोन मिनिटं झालीं ! या खांबाच्या आड राहून तुझं हें कृत्य पहात होतों ! तूं मुरारीच्या गळ्यांत हात घातलास तेव्हांच तूं त्याची सांखळ चोरणार हें मला कळलं ! कहाणी सांगण्याचं ढोंग करून हे बदमाशगिरीचे धंदे करायला शरम नाहीं वाटली तुला ? पाजी, भामटा, गळेकापू—"

बेतू हें सारं निमुटपणें सहन करीत होता. त्यानं खालीं घातलेली मान वर काढली नाहीं ! एरव्ही तो किती तापट, पण स्वतःची चोरी पुराव्यानिशी उघडकीस येतांच तो अगदींच गोगलगाय बनला ! त्याचवेळीं तुळशी नवऱ्याचा चढता आवाज ऐकून बाहेर आली. त्याचप्रमाणें शेजारच्या घरांतील ५।६ माणसंही भराभर तिथं येऊन गोळा झालीं. जो तो काय झालं म्हणून विचारूं लागला. गंगारामनें बेतूचें तें पाप त्या सर्वांना खुलवून सांगितलं. तुळशीला धक्का बसला. तिला वाईट वाटलं. कां ? बेतुनं आपल्या मुलाच्या गळयांतील सांखळी चोरली म्हणून ? छे ! मुळींच नाहीं ! तर भावाच्या त्या कृत्यानें त्याच्या आजवरच्या गुन्हेगारी आयुष्यांत एका नवीन गुन्ह्याची भर पडली म्हणून ! स्वतःच्या यजमानाकडून

पाठीला पाठ लावून आलेल्या भावाला चारचौघांसमोर खालीं मान घालून उभं रहावं लागलं म्हणून—

बेतूला तर तिथं रहाणंच अशक्य झालं. त्यानं आंत जाऊन खुंटीला टांगलेला आपला कोट व टोपी काढून घेतली. कोट आंगात घातला व टोपी डोक्यावर चढविली. आणि मान खालीं घालून मुकाट्यानें तो घराबाहेर पडूं लागला.

जवळच तुळशी उभी होती. ती त्याच्या आड येऊन त्याला अडवित म्हणाली—'कुठं चाललास ?'

तो कांहींच बोलला नाहीं. त्याला तिथं थांबावं असंही वाटेना. यानं बहिणीला एक जोराचा हिसका दिला. तिला बाजूला केलं. आणि तो तिथून एकदांचा निसटला—

गंगाराम व शेजारी तो निघून जातांच उपहासानें हंसूं लागले. 'मूर्ख' कुणीतरी म्हटलं. तुळशीनं डोळ्यांना पदर लावला. आंवढा गिळला. नि एक उसासा टाकून ती मनाशीं म्हणाली—'पाप्या, कुठून दुर्बुद्धी सुचली तुला ही!"



# समुद्रांत उडी टाकली

५

बेतुला आपल्या कृतकर्माचा पश्चाताप झाला अशी ती कांहीं पहिलीच वेळ नव्हे ! त्याला त्याबद्दल अनेकदां पश्चाताप झाला होता. आपल्या अनीतिमान् चारित्र्याची थाळी पिटून जगाच्या स्वागतास पात्र ठरण्याची अपेक्षा त्यानं कधीं चुकून देखील आपल्या मनाशीं केली नव्हती ! सद्वर्तनाच्या न्याय्य जोपासनेकरितां त्यानं परिस्थितीला आटोक्यांत आणण्याचा आजवर अनेकदां प्रयत्न करून पाहिला होता. पण त्यांत तो अपेशी ठरला ! वयाच्या तेराव्या वर्षापासून ही सद्सद्विवेकबुद्धीची टोंचणी तो सहन करीत आला होता. शिक्षण नाहीं, सुसंस्कृति नाहीं, पैशाची प्राप्ति नाहीं, कौटुंबिक उत्तेजन नाहीं, जगाची सहानुभूति नाहीं, उलट स्वत:बद्दलचे जागोजागीं उमटणारे तिरस्काराचेच स्वर त्याला कान

उघडे ठेऊन ऐकावे लागत! डोळे उघडे ठेऊन आपल्या निलाजऱ्या अध:पाताचे घाव नजरेखालून घालावे लागत! महान् तत्ववेत्त्यांनाही देशोधडीस लावणाऱ्या, विजेत्यांना पराजित करणाऱ्या, सम्राटाला भुकेकंगाल बनविणाऱ्या परिस्थितीचे हे क्रूर खेळ बेतूसारख्या फटिंगाला तरी कसे चुकवतां येतील?

त्याच परिस्थितीनें आज स्वत:च्या भाच्याच्या गळ्यांतील सांखळी चोरण्याइतपत त्याला लाचार बनविलं होतं. तो स्वत: तत्ववेत्ता नसल्या-मुळें आपणांत ही गुन्हेगारीची प्रवृत्ति कशी काय बळावते, तिच्या जाळ्यांत आपण हां हां म्हणतां कसे काय गुरफटतो, वगैरे तत्वज्ञान त्याला आकलन होत नव्हतं! पण वाईट आणि बरें यांच्यांतील पंक्ति-प्रपंच न ओळखण्याइतका मात्र तो दुधखुळा खासच नव्हता—

तसं नसतं तर त्याच्यावर आज पश्चाताप करण्याची पाळी तरी कां येती?

मेव्हण्याचं घर सोडून तो आतां भयप्रद अशा अंधारांतून चालला होता. कां कोण जाणे, पण जगणें हा देखील त्याला आज गुन्हा वाटत होता. मृत्यूचे घातुक विचार त्याच्या मनांत थैमान घालीत होते. तो समुद्राच्या दिशेनं चालला होता. प्रथम तो कांयसुवचा कोट चढून गेला. हा पडीत कोट म्हणजे त्या गांवचा एक पुरातन अवशेष होता. तिथंच सिद्धेश्वराचं एक छोटं देवस्थान होतं. देवस्थानच्या पायरीला लागूनच समुद्र होता. जवळच लाटांचं तांडवनृत्य सुरू होतं. बेतू देवस्थानच्या पायरीवर जाऊन बसला.

त्यानं डोक्याची टोपी काढून दूर भिरकावुन दिली. केसांत डाव्या हाताचीं बोटं खुपसून तो विचार करूं लागला.

त्याच्या मनांत आलं, एकदोन दिवसांत आपल्या आजच्या या अपकृत्याचा फैलाव सबंध कांयसुवभर होऊन लगेच त्याचे पडसाद एकोशीला देखील जाऊन उमटतील. आणि आपली यापूर्वी कधीं झाली नव्हती इतकी छी थू होईल ! आईला, गीतेला तें ऐकून काय वाटेल ? आधींच आपल्या कर्माचं गालबोट त्या निरपराध जिवांना चारचौघांत माना खालीं घालावयास भाग पाडीत आहे ! त्यांत आपल्या आजच्या नवीन पापाची भर पडणार ! मनुष्याची दुष्कृत्यें जितक्या जलद गतीनें घरोघर पोंचतात तितकीं त्याची सत्कृत्यें पोंचूं शकत नाहींत, हें कावेबाज जगाचें व्यवहारांतील नीतितत्त्व त्यानं आजवर कितीदां तरी आत्मसात केलं होतं. त्यामुळं उद्यां घडणाऱ्या गोष्टी त्याला आजच स्पष्ट दिसत होत्या. त्यांचं तें काल्पनिक दर्शनही त्याप्रसंगीं हळुवार बनलेल्या त्याच्या हृदयाची चिरफाड करीत होतं. हें काळं तोंड यापुढं तरी जगाला आपण दाखविणं शक्य नाहीं ! आग लागो असल्या जिण्याला ! त्यापेक्षां या समुद्रांत उडी टाकणं कांहीं वाईट नाहीं ! त्यामुळें आपणाबरोबर आपलीं कुकर्मेंही जगांतून नामिशेश होतील ! आपणामुळें कित्येकांना होणारा त्रास वांचेल ! अशारितीची विचारसरणी सुरूं झाली, आणि तो आसपास पाहूं लागला.

समोर विशाल असा समुद्र पसरला होता. काळ्याकभिन्न रात्रीनं त्यावर आपली गढत छाया पसरल्यामुळें त्याची हालचाल तितकी गंभीर तितकीच भयप्रद भासत होती. जवळपास मनुष्यच काय पण एकादं चिटपाखरूंहि फिरकतांना बेतूच्या पहाण्यांत आलं नव्हतं. नाहीं म्हणायला फक्त रातकिरडयांचा कर्णकटु आवाज कानावर येत होता वेळेवर रांगेनं उभे असलेले माड गायनाच्या एकाद्या मजलशींत मान

हालविणाऱ्या रसिकाप्रमाणें डुलत होते. तीनचार फतेमाऱ्या, पांचसहा होड्या नि सात आठ पऱ्हेळ बंदरांत नांगरून पडले होते. कांठाला लहानमोठीं खडकं होतीं. त्यावर जवळच खेळकरपणानें बागडणाऱ्या समुद्राच्या लांटा येऊन आदळत नि फुटत. मधून मधून त्यांचे तुषार उडून बेतुचें कपडे व आंग भिजून जाई.

"ऊठ बेतू!" त्याच्या मनानं त्याला इषारा दिला. तें पुढं म्हणालं— "आतां कसला विचार करतो आहेस? अजून का तुला मरणाची भीति वाटते? वेड्या, हें जग म्हणजे मधाचं पोळें आहे! याच्यांतूनच लोकांना मधाचा पुरवठा होतो! आणि याच्यामुळेंच कांहींना मधमाशांचे डंखही सहन करावे लागतात! आज १५ वर्षे स्वतंत्र बुद्धीनं या जगाचा तूं अनुभव घेत आहेस! मधासाठीं तुझी सगळी धडपड! पण तो तुला आजवर कधींतरी मिळाला का? नाहीं! उलट, तो मिळवितांना तुला मधमाशांचाच त्रास अधिक झाला! असलें जिणें! त्यांत जगण्यासारखं काय आहे? आणि या समुद्रांत उडी टाकून तूं मेलास म्हणून उद्यां तुझ्यामुळें कोणाचं कितीसं नुकसान होणार आहे? तुझ्यासाठीं कितीसे लोक हळहळत बसणार आहेत? फार तर 'गांवचीं एक पिडा गेली!' म्हणून तुझे सोयरेदायरे समाधानाचे उष्ण सुस्कारे सोडूं लागतील! आणि दुःख झालंच तर तें फक्त तिघांनाच होईल! जिनं तुझा नऊ महिने प्रतिपाळ केला तिला व बहीण म्हणून तुळशीला नि गीतेला! एरव्हीं तुझ्याबद्दल प्रेम, जिव्हाळा अगर आदर बाळगणारा इसम जगांत दुसरा कोण आहे? हं, लवकर आटप—"

त्यानं अधिक डोकं खाजविलं नाहीं. आपण जगावं असं वाटण्यासारखा त्याला जगांतील कोणताच मोह त्यावेळीं भुरळ पाडूं शकला

नाहीं. मृत्यु हेंच त्याचं अंतिम आकर्षण ठरलं ! त्यासाठीं त्यानं आपली धडपड सुरू केली. आपले पश्चात्य आपल्या मृत्युची खूण म्हणून त्यानं आंगावरचे कपडे उतरून तो उभा होता त्या पायरीवर ठेवले. त्याला पोहतां येत नव्हतें. एकच क्षण ! त्याला आपल्या आईची आठवण झाली. तुळशी, गीता त्याच्या दृष्टीसमोर उभी राहिली. " नाहीं ! हे असले चाळे आतां उपयोगी नाहीं ! " तो मनाशीं म्हणाला, आणि दुसऱ्याचक्षणीं त्यानं पाण्यांत उडी टाकली—

—धप्—

पाणी वर उसळलं. बेतू आंत गेला. लाटांना आपण त्याला पोटांत घेतलं म्हणून गर्व चढला. पण त्यांचा तो गर्व फोल होता. बेतूच्या आयुष्याची दोरी अजून तुटली नव्हती. मृत्यु त्याला गिळूं शकत नव्हता. त्याचा काळ आला होता पण वेळ आली नव्हती—

कारण, कोटाच्या दुसऱ्या बाजूला कांहींशा अंतरावर त्यावेळीं कुणि एक क्रिस्तांव पाण्यांत गळ सोडून खडकावर बसला होता. त्याची अचानक त्या बाजुला दृष्टि गेली. कुणि तरी पाण्यांत उडी टाकली आहे एवढं त्यानं ओळखलं. त्याला रहावेना. त्यानं गळ वर उचलून तो बाजुला ठेवून दिला. आतांपर्यंत त्या गळाच्या सहाय्यानें पकडलेली मासळी त्यानं एका पिसवींत जमा केली होती तीही त्यानं तिथंच सोडून दिली, तो जीव दिलेल्याच्या मदतीस धांवला.

त्यानं पाण्यांत उडी टाकली.

आंत जातांच परिस्थिति बिकट आहे हें त्यानं ओळखलं. तो आपली सर्व शक्ति एकवटून प्रयत्न करूं लागला. त्यानं नेमकाच

बुडणाऱ्याच्या शेंडीला हात घातला. जोरजोरानं ओढायला सुरवात केली. धीरेधीरे का होईना त्याला त्या प्रयत्नांत यशही आलं. बेतूसह तो हळुहळू पुढें सरकत त्या देवस्थानच्या पायरीवर येऊन टेपला. वाघानं नखं लावून ओरबडावं तद्वत बेतुचं सबंध शरीर खरपटून त्यांतून रक्त वहात होतं. नाकातोंडांत पाणी गेल्यानें बेतू बेशुद्ध झाला होता. त्याला एकट्यानंच उचलून जवळच्या भातेरीच्या झाडाखालीं नेऊन ठेवलं. तिथं त्याला एकटंच सोडून तो मदतीसाठीं शेजारच्या एका झोंपडीकडे पळत सुटला. तिथून तो परतला तो दोन माणसांना सहाय्याला घेऊन. त्यानं त्या लोकांच्या मदतीनं बेतुला शुद्धीवर आणण्याचा प्रयत्न केला. कांहीं वेळानं बेतू डोळे उघडून पहातों तों आपल्या परिस्थितीचा त्याला कांहींच बोध होईना. जणुं काय आपण स्वप्नांत असल्याचा त्याला त्याक्षणीं भास झाला. कितीतरी वेळ तो तसाच पडून होता. त्याच्याजवळ एकंदर तीन माणसं जमा झालीं होतीं. त्यापैकीं एकाच्या हातीं पेटती चुडी होती. त्या चुडीकडे बेतू आतां डोळे फाडून पहात होता. त्याला जीवदान दिलेला क्रिस्तांव तितक्यांत त्याला घडलेली हकिगत समजावून देऊं लागला. बेतूच्या डोक्यांत लख्खन् प्रकाश पडला. त्याला नवल वाटलं. आपण समुद्रांत उडी टाकली तेव्हां जवळपास कुणीच नाहीं याची त्यानं मनाशीं खात्री करून घेतली होती. मग हा क्रिस्तांव जवळपास बसला असून आपल्या दृष्टींतून त्यावेळीं कसा काय निसटला याचं त्याला आश्चर्य वाटलं. त्या योगायोगाबद्दल तो कितीतरी वेळ विचार करूं लागला. आजवर मृत्युच्या राक्षशी जबड्यांतून त्या योगायोगानंच त्याला दोनदां खेंचून बाहेर आणला होता. एकदां

मागं त्याला डोंगरमाथ्यावर साप चावला तेव्हां आणि आज दुसऱ्यांदा. पैकीं पहिला प्रसंग अनपेक्षित होता. त्यांतून तो निभावला यांत त्याला आनंदच होता. तो आनंद त्याला आज झाला नाहीं. कारण आज त्याला मृत्यूंत आनंद होता, जगण्यांत नव्हे! पण तेवढंही सुख आपल्या नशिबीं नाहीं असं त्याला वाटलं. त्यानं खिन्न हास्य केलं. कपाळावर हात मारून घेतला—

तें पाहून त्याला समुद्रांतून वर काढणाऱ्या ख्रिस्तांवानं म्हटलं— "अभाग्या, जगांत जगतां यावं म्हणून माणसाची केवढी तरी धडपड चाललेली असते! नाहींतर तूं!—"

"—आजवर माझीही तशीच समजूत होती. पण आज ती बदलल्यामुळें मी आत्मघात करावयास प्रवृत्त झालों होतों! पण मूर्ख मनुष्या, तूं माझा घात केलास! वास्तविक तुझं कर्तव्य तूं केलस! पण तें करतांना एका गाडलेल्या पापाला पुन्हां उकरून काढण्यांत तूं जगाचा मोठाच गुन्हा केला आहेस—"

त्याच्या त्या वर्तनाचा अर्थच तिथं जमलेल्या त्या मंडळींना समजेना. 'याला वेड तर लागलेलं नाहीं ना?' अशा अविर्भावानं ते तिघे त्याच्याकडे 'आ' वासून पाहूं लागले.

—समुद्रावर लाटांचा खेळ पूर्वीं प्रमाणेंच चालू होता. आकाशांत मोठमोठाले ढग गळ्यांत गळा घालून एकमेकाशीं कानगोष्टी करीत होते. चांदोबा अंधाराची जपमाळ घेऊन मार्गक्रमणा करीत होता. मासळी मारायला गेलेले कोळी आपापल्या होड्या घेऊन परत किनाऱ्याला येत होते. अजून एकही कोंबडा आरवला नव्हता—

# घराबाहेर

## ६

जायु तारीजवळ मासळी विक्रीत बसली होती. टोपलीवर एक वीत रुंदीची फळी टाकून तिनं त्यावर दोन दोन पैसे दराचे सुंकटांचे वाटे घातले होते. तिला लागूनच रांगेनं आणखी दोघीतिघी नुस्तेकरणी बसल्या होत्या. त्यांच्यासमोर गिऱ्हाइकांची येजा सुरू होती. पणजीकडून हळदोण्याकडे जाणारा वाफोर नुकताच एकोशी बंदरांत येऊन थडकला होता! उतारूंना उतरून घेण्यासाठीं किनारा सोडून तार हळुहळू वाफराकडे जात होती. एक केंस पिकलेली गावडीण हातांत घासलेटची रिकामी बाटली घेऊन पसऱ्यावर चालली होती. गुस्तांवच्या दारूच्या दुकानासमोर दोन दारुडे पैशांवरून भांडत होते. रस्त्यावरील हळर्णकराच्या घरांतील सोप्यावर बसून स्वतःला भलत्याच

शिष्ट समजणाऱ्या ३।४ व्यक्ति पणजीला काल रात्रौ पाहिलेल्या एका धंदेवाईक नाटक कंपनीच्या 'मानापमान' नाटकाविषयीं चर्चा करीत बसल्या होत्या. त्यांत गांवची मराठी शाळा चालविणारा राघोबा मास्तर हा एक होता. कांहीं वर्षांपूर्वी पाहिलेल्या कै. केशवराव भोंसल्याच्या मानापमानांतील धैर्यधराच्या भूमिकेशीं काल रात्रौ पाहिलेल्या धैर्यधराच्या भूमिकेची तुलना करून तो एकाद्या तज्ञाच्या दृष्टीनें तिचा फोलपणा पटवून देत होता. इतरजण होयबाचं काम करीत होते. हळुहळू उजेडाचं प्रमाण कमी होत चाललं होतं. डोंगरावर जळणासाठीं लाकडं आणायला गेलेल्या दोन्ही बायका डोक्यावर भारे ठेऊन डोंगराची उतरण उतरत होत्या. श्रीपाद भटाची धाकटी सून घरांतील चौकींत बसून वाती वळीत होती. रांपणवाडयांतील एका घराच्या अंगणांत डोळ्यांत फूल पडलेली एक तरणीताठी मुलगी व तिचा सहा वर्षे वयाचा छोटा भाऊ घुडांत आलेल्या कोंबड्यांपैकीं त्यांची एक कोंबडी कमी झाल्यानें ती कुणीतरी लांबवली असल्याच्या सबबीवर शिवीगाळ करीत होतीं. बंदरांत उभा असलेला वाफोर उतारूंना उतरून हळदोण्याकडे धूर ओकीत चालला होता. उतारूंसह तार आतां किनाऱ्याकडे येत होती.

तारींत एकंदर १०।१२ माणसं होतीं. तार किनाऱ्याला येऊन लागतांच तीं खालीं उतरलीं. दरेकानं एकेक पैसा तारवाल्याकडे देऊन तारीचं भाडं चुकतं केलं. आणि जो तो आपापल्या घरच्या दिशेनं चालूं लागला.

त्यापैकीं एकाला मासळी विकीत बसलेल्या जायुनं 'केसूदादा' म्हणून हटकलं. तिनं त्याला प्रश्न केला—"तुम्ही कांयसुवला गेला होतां नाहीं?"

"होय. लग्न होतं ना कुष्टाचं—"

"आमचा बेतूही गेला होता त्या'लग्नाला. भेटला होता ना तुम्हाला?"

"—अग् हो! बरी आठवण केलीस—" इतकं बोलून तिला केसूदादानें खुणेनं जवळ बोलावून घेतली. तिच्या कानाशीं तोंड नेऊन बेतूनं स्वतःच्या भाच्याच्या गळ्यांतून सोन्याची सांखळी चोरण्याचा व त्या रात्रीं पश्चातापानें समुद्रांत उडी टाकून आत्महत्या करण्याचा केलेला प्रयत्न वगैरे बातमी तिला तिखटमिठ लावून सांगितली.

जायुला ती बातमी ऐकून धक्का बसला. तिनं बेतूविषयीं त्यांच्यापाशीं अधिक खुलासेवार चौकशी केली. 'पाड पडो त्याचं!' ती दाटून आलेल्या गळ्यांतून उद्गारली. पुन्हां टोपलीजवळ जाऊन मासळी विकीत बसली.

केसूदादा निघून गेला.

तिला आतां तिथं बसवेना. डोळ्यांत सांचलेले अश्रु तिनं एकसारखे दोनदां पुसून घेतले. टोपलींत थोडींशीच सुंकटं शिल्लक होतीं तीं घेऊन आपण घरची वाट धरावी असं तिला वाटलं. तोंच लंगोट लावलेला व आंगांत बानयेन घातलेला एक क्रिस्तांवाचा मुलगा तिला सुंकटांच्या वाट्याचा दर विचारूं लागला. 'दोन पैसे!' तिनं उत्तर दिलं. त्याने दोन वाटे विकत घेतले. चार आण्याची नोट काढून तिच्यापुढें धरली. जायुनं त्याला ती रुपयाची नोट समजून १५ आणे

परत केले. मुलगा प्रामाणिक होता. हातांतील रक्कम पाहून त्यानं जायुला विचारलं—" तुझं लक्ष कुठं आहे ? "

" का ? "

त्यानं हातांतील रक्कम तिला दाखवित म्हटलं—" पहा ! "

तिनं रक्कम मोजली. तिच्या दृष्टीनं तो हिशोब बरोबर होता. अर्थ न उमजून तिनं त्याला विचारलं—" तूं माझ्याकडे किती‌ची नोट दिलीस?"

" चार आण्याची ! "

" असं होय ! मला वाटलं कीं ती एक रुपयाची नोट आहे ! " इतकं बोलून जायुनं त्या रकमेपैकीं १२ आणे परत घेतले, नि ती म्हणाली—" देव तुझं भलें करो ! "

उरलेलीं सुकटंही तिच्या टोपलींतून १।२ मिनिटांतच खलास झाली. तिनं विक्रीचे पैसे मोजले. रिकामी टोपली उचलून डाव्या कडेंत धरली. घाईघाईनं ती रस्ता चालू लागली. दिवा लागायच्या आंत तिनं घरांत प्रवेश केला.

त्यावेळीं एक औषधी मुळी गीता फातरीवर दुधांतून घांसीत बसली होती. दारांत पावलं वाजतांच तिनं मान वर केली. आईनं लेकीकडे पाहिलं. लेकीनं आईकडे पाहिलं. नुकताच केसूदादाकडून ऐकलेला वृत्तांत जायुनं गीतेच्या कानावर घातला. त्या पोरीच्या हातांतील मुळी गळून पडली. तिच्या हातापायाला कापरं भरलं. डोळ्यांत अश्रु उभे राहिले. छातीं धडधडूं लागली. बेतू लफंगा असला तरी तो तिचा भाऊ होता. त्याच्यावर गीतेचं प्राणापलिकडे प्रेम होतं. त्याच्यापेक्षां वयानं

बरीच लहान असूनही ती त्याला त्याचं वर्तन सुधारावं म्हणून नेहमींच हरतऱ्हेनं उपदेश करी. पण त्यांत तिला यश येत नसे. उलट्या घागरीवर पाणी तसा बेतुच्या बाबतींत तिला वेळोवेळीं अनुभव येत असे. पुढें पुढें तर बेतू कधीं सुधारेल याविषयीं तिला वाटणारी आशाही पुरतीच नष्ट झाली. पोटचा पोर असूनही आपल्या आईचं बेतूसंबंधींचं असावं तितकं चांगलं मत नाहीं हेंहि गीता ओळखून होती. यालाही झाला तरी बेतूचा दुर्वर्तनी स्वभावच कारणीभूत होता. आपल्या पोरानं नेहमींच दुर्वतनापासून अलिप्त असावं, लोकांनीं जरी त्याला बरा म्हटला नाही तरी निदान वाईट म्हणूं नये अशी त्या माउलीची अपेक्षा असायची. पण तेवढंही समाधान तिला मिळूं नये इतकी परिस्थिति तिच्या विरुद्ध होती. चार दिवस काळजीविना जायचे. पांचव्याच दिवशीं बेतूनं केलेली एकादी नवीन भानगड तिच्या कानावरून जायची. तिचा जीव तडफडायचा. बेतू घरीं आला म्हणजे त्याबद्दल त्या उभयतांची हटकून बोलाचाल होऊन त्याचं पर्यवसान भांडणतंट्यांत व्हायचं. मारामारीपर्यंत प्रसंग यायचे. एकादे वेळीं बेतू संतापून घर सोडूनही जायचा. कांहीं दिवस कांयसुवळा जाऊन बहिणीकडे रहायचा. राग शांत झाला म्हणजे पुन्हां निलाजऱ्या चेहऱ्यानं घरीं यायचा.

असा हा प्रकार आज कितीतरी वर्षे चालला होता.

पण आजच्या इतकी जायु बेनूवर मनांतून कधींच रागावली नव्हती. तिला त्याची आतां जी जबर चीड आली ती केवळ त्यानं प्रत्यक्ष आपल्या भाच्याच्या गळ्यांतील सांखळी चोरल्यामुळेंच! आज याची इथपर्यंत मजल गेली, उद्यां हा चांडाळ पैशांसाठीं माझ्या मानेवर सुरादेखिल ठेवायला

कमी करायचा नाहीं! कुष्टाच्या लग्नांत अहेर म्हणून देण्यासाठीं आपण याच्याकडे अर्धें पवन दिलं. थोडासा मुर्खपणाच घडला आपल्या हातून हा! मला नाहीं वाटत, यानें तें अर्धें पवन कुष्टाला दिलं असेल म्हणून! बेतू लग्नालाही नव्हता असं केसूदादा तर नुकताच म्हणाला. येऊं दे तर खरा आतां घरीं! दारांत उभा देखिल करीत नाहीं! डुक्कर मेला! मरतदेखिल नाहीं दुष्ट—"जायु मनाशीं खल करीत होती.

त्याच रात्रीं ९।१० वाजण्याच्या सुमारास बेतू कफल्लक स्थितींत घरीं आला. त्याची दाढी वाढली होती. डोळे खोल गेले होते. एखाद्या आजारी माणसासारखा तो त्यावेळीं दिसत होता.

तरीही जायु त्याच्यावर संतापलीच. दयेचा कोमल पाश तिनं पायाखालीं तुडविला. मातृहृदयाची कर्तव्यपरंपरा ती विसरली. तिनं आकांत केला. यापुढें उदकाचा घोंटदेखिल प्यायला तूं या घरांत राहूं नकोस असा तिनं त्याला इषारा दिला. कांयसुवला त्यानं जे दिवे पाजळले होते त्याची त्याला कठोर शब्दांत जाणीव करून दिली. शिव्याशापांचा त्याच्यावर भडिमार केला. ती म्हणाली—" आजवर तुझे अनेक अपराध पोटांत घातले! पण यापुढें ते शक्य नाहीं! एकतर तूं तरी हें घर सोडून गेलं पाहिजेस नपेक्षां मला तरी हें घर सोडलं पाहिजे!"

जायु तावातावानें बोलत होती. गीता तिचं सांत्वन करण्याचा प्रयत्न करीत होती. पण ती ऐकेना. बेतूनं आल्यापावलीं परत जावं एवढ्याच हट्टाला ती पेटली. त्यानं पुन्हा कालत्रयीही आपल्या घराचा उंबरठा चढूं नये अशा निश्चित धोरणानं ती धापा टाकीत बोलत होती.

आणि सर्वांत आश्चर्याची गोष्ट ह्मणजे बेतू तिला उत्तर देण्यासाठीं एक शब्दही तोंडावाटे उच्चारीत नव्हता.

शेजारचे लोक ती गडबड ऐकून तिथं गोळा झाले. जो तो बेतुलाच त्यासंबंधीं दोष देऊं लागला. त्याची कानउघाडणी करूं लागला. मरून पडलेल्या बैलाला गिधांडांनी येऊन फाडून खावं तसा बेतूला त्या लोकांचा त्यावेळीं अनुभव आला. तिथं रहाणं त्याला अशक्य झालं. घर सोडून तो रस्त्यावर आला. आपण कुठे जातों, जाऊन काय करणार, कुठं झोंपणार, अशा अपरात्रीं कोण आपणाला आसरा देणार वगैरे संबंधी त्यानं काडीमात्रही विचार केला नव्हता. विचार करण्यासारखी ती परिस्थितीहि नव्हती. त्याचं नशीबच त्याच्यावर उलटलं होतं. त्यानंच त्याचा हात धरून त्याला घराबाहेर काढलं होतं—

तो आज सगळा दिवस जेवला नव्हता. नुसत्या पाण्यावरच त्यानं आजची वेळ मारून नेली होती. त्यामुळें त्याची गात्रं शिथिल झालीं होतीं. आंगांत त्राण उरलं नव्हतं. शिवाय ५।६ कोसांचा पायीं प्रवास केल्यामुळें तो अगदीं थकून गेला होता.

त्यानं घरीं येण्यापूर्वी आज मोठमोठाले बेत केले होते . मनाशीं नवीन अशा योजना आंखल्या होत्या. जीविताशीं सत्कृत्याच्या गुजगोष्टी केल्या होत्या. नीतिला वंदन केलं होतं. याउप्पर जगांत सन्मार्गानं जीवन जगविण्याची शपथ वाहिली होती. आपल्या आजवरच्या दुर्वतनाला चिखलाची उपमा देऊन कमळाचा जन्मही या चिखलांतच होतो असा अंतर्यामीं निष्कर्ष काढला होता. मनुष्याला पापाकडून पुण्याकडे नेणारी

पश्चाताप ही एक दिव्यौषधी आहे या गहन तत्वज्ञानाचा पाठ त्यानं आयुष्यांत आज पहिल्यांदाच गिरवायला सुरवात केली होती.

—पण त्याच्या अंतःकरणांत उमटलेले ते सत्कर्माचे पडसाद आपल्या अळवाची खाज माहित असलेल्या त्याच्या आईला कसे ऐकू यावे? त्यानं सत्य सांगितलें असतें तरीहि तिनं त्यावर विश्वास ठेवला नसता. त्याला नीतिची चाड आहे हेंच मुळीं कुणि कबूल केलं नसतं—

भलतीच रात्र झाली होती. एकट्या बेतूखेरीज रस्ता निर्मनुष्य होता. चांदणं पडलं होतं. जणूं उजाडल्यासारखं वाटे. कांहीं पुढं गेल्यावर रस्त्यांच्या एका बाजूला त्याला एक वडाचं झाड लागलं. त्यावर लाल कपड्याच्या गुड्या लटकत होत्या. तिथं पोंचतांच बेतूचे पाय एकाएकीं लटपटूं लागले. छाती धडधडूं लागली. आंगावर कांटा उभा राहिला. त्याठिकाणीं रात्रीच्या वेळीं देवचार कांबळ पांघरून बसलेला असतो असं गांवचे बहुतेक लोक सांगत तें त्यानें ऐकलं होतं. त्यालाही त्याचा प्रत्यय आला. एकाएकीं वडाच्या पानांतून सळसळ असा आवाज निघाला. कुणीतरी वरून घाईघाईनं खालीं उतरत आहे, असं बेतूला क्षणभर वाटलं. त्यानं 'राम राम' म्हटलं. आणि घामाघूम बनलेल्या स्थितींत तो जवळजवळ रस्त्यांतून पळतच सुटला—

कांहीं वेळानं त्यानं एका घराचं दार जाऊन ठोठावलं. आंतून एका मुलीनं 'कोण?' असा सवाल केला. 'मी बेतू!' बाहेरून उत्तर मिळालं. मुलीनं दिवा पेटविला. दार उघडलं. आणि समोरच्या व्यक्तीकडे पाहून म्हटलं—"इतक्या रात्रीं?"

"तुझा वडील कुठं आहे कार्मिन ?"

"ते हळदोण्याला गेले आहेत. उद्यां परत येतील—"

"—आणि तूं घरांत एकटीच ?—"

"होय !"

"बरं, मग जातों मी !"

"कां आला होतास ?"

बेतूनं येण्याचं खरं कारण तिला सांगितलं. आपली परिस्थिति तिला थोड्क्यांत समजावून दिली. "या एका रात्रीपुरता मला या घरचा आसरा पाहिजे होता म्हणून तुमच्याकडे आलों होतों ! इथंच कुठंतरी झोंपावं अशी माझी इच्छा होती ! पण नको ! तूं घरांत एकटी पडलीस ! मी बोलून चालून पुरूष ! निदान आज तरी मी या घरांत झोंपणं योग्य होणार नाहीं ! तुझा वडील घरांत असता, तर गोष्ट निराळी होती—"

कार्मिनला त्याचा तो दृष्टिकोण चुकीचा वाटला नाहीं. पण त्याकरितां बेतूला अडल्यावेळीं आपण झोंपण्यापुरतीही जागा देऊं नये हा न्याय तिला तितकासा रुचला नाहीं. बेतूला ती आतां ज्या लाचार स्थितींत पहात होती ती स्थितीच इतकी करुणास्पद होती कीं त्या स्थितींत त्याला मदत नाकारणं हा तिच्या दृष्टीनं कृतघ्नपणा होता. तिला बेतूची दया आली. ती म्हणाली—"कांहीं हरकत नाहीं ! मी तुला अंथरायला आणून देतें ! पण मला आधीं हें सांग कीं तूं जेवलास का ? मला वाटतं तूं जेवलेला नाहींस ! तुझा चेहराच सांगतो आहे तसं ! मी तुला

रांधून वाढलं असतं ! पण तूं पडलास हिंदु ! मी रांधलेलं तुला कस बरं चालेल ? बरं, तुला कांहीं खायला दिलं तर चालेल का ? केळीं देतें तुला ! वाटल्यास पावही देतें बरोबर खायला ! वर पाणी पी आणि मग झोंपायला चल–" इतकं बोलून ती तें साहित्य आणण्यासाठीं घाईघाईनं आंत पळाली सुद्धां.

बेतूनं सोप्यावर बैठक मांडली. तो मनाशीं म्हणत होता–"कार्मिन, तूं किती गोड मुलगी आहेस ! आई पोटच्या मुलाबद्दल दाखविणार नाहीं, बहीण भावाबद्दल दाखविणार नाहीं, इतकी सहानुभूति माझ्याबद्दल तूं आतां दाखविलीस ! कसा उतराई होऊं तुझा मी ?—"

—आणि त्याचवेळीं कार्मिन हातांत कांहीं सांहित्य घेऊन बाहेर आली—



# खाणावळींतील परी

## ७

पणजीच्या मार्केटांत लोकांची नुकतीच ये जा सुरू झाली होती. एकीकडे कलिंगडांच्या मोठमोठ्या राशी पडल्या होत्या. अद्यापिही कलिंगडं भरून बाहेर गांवच्या बैलगाड्या तिथं येतच होत्या. त्याला लागूनच निरनिराळ्या जातीचीं मातीचीं मडकीं विक्रीसाठीं मांडली होतीं. जवळच रताळीं, भेंड्या, मुळे, वांगीं वगैरे शाकभाज्यांनीं भरलेल्या असंख्य टोपल्यांच्या रांगाच रांगा लागल्या होत्या. कांहीं क्रिस्तांवणी पेरू, पोपया, तेरफळं व फुलें यांची एकत्रित विक्री करतांना दिसत. शेजारींच मासळी विकण्याचा सोपा होता. तिथं बसलेल्या प्रत्येक नुस्तेंकरणीकडे एकेक तराजू व वजनं होतीं. त्याचं कारण, नुकताच तोलून मासळी विकण्याचा कायदा जारी झाला होता. त्या

कायद्याप्रमाणें वागणं हे त्या धंद्यांतील प्रत्येक व्यक्तीचं कर्तव्य होऊन बसलं होतं. शेजारीं भुसारी मालाचीं दुकानं होतीं. कांहीं अंतरावर भजीं व इतर खाद्य पदार्थ, त्याचप्रमाणें सोडा, लेमन वगैरे पेयं विकणाऱ्या हातगाड्या एकमेकाला लागून उभ्या होत्या. कलिंगडाच्या राशीजवळ कांहीं मिस्तिसांची उडाणटप्पू पोरं उभीं राहून उगीच एकादं कलिंगड उचलून त्याचा दर विचारीत. पुन्हां तें राशीवर फेंकून देत. कांहींवेळ तिथंच ताटकळत उभीं रहात. पण त्यांच्यामुळें कलिंगडं विकणाऱ्यांना भलताच त्रास होई. कारण त्या पोरांपासून कलिंगडं चोरीला जाण्याचाच अधिक संभव असल्यानें त्यांना डोळ्यांत तेल घालून जपावं लागे. तिथंच एक बैठ्या इमारतींत एक क्रिस्तांवाचं ल्हानगं पुजात होतं. हें पुजात तिथं नवीनच होतं. दोन तीन महिने झाले होते त्याची स्थापना होऊन. या पुजाताची मालकी कार्मिनचा बाप सांतान याच्याकडे होती. मोठा कल्पक मनुष्य! जवळ भांडवल नव्हतं म्हणून इतके दिवस पोंबुर्प्यासारख्या खेड्यांत जांभया देत बसला होता. कित्येक वर्षांपासून पणजींत असं एकादं पुजात उघडण्याचें तो मनांतून मांडे खात होता. पण निष्कांचन माणसांचे मनोरे म्हणजे बोलून चालून जळणारी मेणबत्तीच. शेवटीं दुर्दैवानं दुमिंग भाटकाराची कार्मिनवर बलात्कार करण्यापर्यंत मजल गेली आणि तिच्या तडजोडींतून सांतानचं टपोरं सुदैव उदयास आलं. बेतूच्या सांगण्यावरून सांताननं दुमिंग भाटकारावरील खटला हातोहात मागं घेतला आणि त्याबद्दलची बक्षिसी म्हणून दुमिंग भाटकाराकडून २५० रुपये सांतानला व ५० रुपये बेतूला मिळवून दिले. हा सौदा अतिशय गुप्तरित्या पार पडला गेला.

हातीं पैसे येतांच सांतानची पुजाताची कल्पना पुन्हां उसळी मारून वर आली. तो पोंबुर्पे सोडून कार्मिनसह पणजीला रहायला आला. येतांच जागा भाड्यानं घेऊन त्यानं पुजात उघडलं. पुजातांत कार्मिन गल्ल्याचं काम संभाळी. सांतान इतर कामं पाही. सांतानची ही कल्पना कांहीं कारणामुळें का असेना पण अल्पावधींतच यशस्वी ठरली. त्याचं कारण तिथं मिळणारं चवदार जेवण हें नसून गल्ल्यावर बसणारी कार्मिन हें होतं. कार्मिनचं अप्रतिम सौंदर्य हें त्या पुजाताचं मोठ्यांत मोठं आकर्षण! पाखले, सोल्दाद, ड्रायव्हर, क्लीनर, घरं रंगविणारे व चिरे कातणारे कामकरी वगैरे हरतऱ्हेची क्रिस्तांव मंडळी जेवणासाठीं त्या पुजातांत येत. कार्मिनची थट्टामस्करी करीत. तिच्याशीं गुलगुल गोष्टी करण्यांत तन्मय होत. अरसिकांतला अरसिकही तिच्याशीं बोलूं लागला म्हणजे क्षणांत रसिक बनून जाई. कुणि जेवायला येतांना तिच्यासाठीं मुद्दाम फुलांच्या वेण्या घेऊन येत. कुणि तिला ऐकूं जाईल अशा रीतीनं टेबलापाशीं जेवायला बसतां बसतां एकादं गाणं गुण-गुणण्यास सुरवात करीत. कुणि एकादं भज्यांचं पुडकं हातांत धरून त्यांतील एकेक भजें तोंडांत टाकीत पुजातांत प्रवेश करीत. आणि त्यावेळीं कार्मिन गल्ल्यावर बसलेली असली कीं, तें पुडकं हटकून तिच्यापुढें धरून त्यांतील एकादं भजें घेण्याचा तिला आग्रह करीत. कार्मिन अशा गोष्टींना फारच कमी उत्तेजन देई. तिला गिऱ्हाईकांचा तो चावटपणा मुळींच संमत नव्हता. ती केव्हां केव्हां मनाशीं म्हणे, कुठून आपल्या वडिलांना हें पुजात काढण्याची दुर्बुद्धी सुचली देव जाणें! खेड्यांतील लोकांची अकृत्रिम वागणूक आणि त्यांचा मनमोकळा स्वभाव

यांचा पुजातांत जेवायाला येणाऱ्या रोजच्या शहरी गिऱ्हाईकांत तिला कधीं चुकूनदेखील आढळ होईना. नाहीं म्हणायला त्या वर्तनाला अपवाद असा एकच इसम मधून मधून त्या पुजातांत जेवायला यायचा. आणि तो म्हणजे आल्बेंत. तो महिन्यापूर्वी सेगुंद काब होता. नुकतंच त्याला आणखी एक फीत चढून त्याची गणना प्रिमैर काबांत होऊं लागली होती. तो वर्तनानं अतिशय साधा होता. त्याचे डोळे घारे होते. हंसताना त्याच्या उजव्या गालावर खळी पडायची. त्याचं वय तिशीच्या आंत असावं. तो फारच कमी बोलत असे. कारणाशिवाय बोलणं हा मुळीं त्याचा स्वभावधर्मच नव्हता. पोलिसांत नौकरी करून हा मनुष्य इतका साधा कसा याचं कार्मिनला पुष्कळवेळां कोडं पडे. तो नेहमींच आपल्या खाकी युनिफार्ममध्यें असायचा. का कोण जाणे, पण कार्मिनला हा मनुष्य फार आवडायचा. त्याचं स्वागत करतांना कार्मिन त्याच्याकडे पाहून कधीं हंसली नाहीं असं सहसा कधीं घडत नसे. त्या हंसण्यांत सोज्वलतेची झांक असायची. पावित्र्याचं तेज असायचं. आल्बेंतलाही तिचं ते हास्य मोठं गोड वाटायचं. तोही तिच्याकडे पाहून हंसायचा.

पण आज तीन दिवस झाले, आल्बेंत त्या पुजातांत जेवायला आला नव्हता. असं कां व्हावं हें कार्मिनला विचार करूनही समजेना. तो आजारी असेल का? कां कुठं बाहेरगांवीं गेला असेल? वगैरे अनेक प्रश्न तिला भंडावून सोडूं लागले. तिला मुळीं चैनच पडेना. महालक्ष्मीच्या देवळानजीक असलेल्या झरीच्या जवळपास कुठंतरी तो रहातो एवढं तिला माहित होतं. पण त्याचा नेमका असा पत्ता तिला माहित नव्हता. त्याचा दुसरा पत्ता तिला परिचित होता, तो आल्बेंत

जिथं नोकरी करी त्या पोलिसकचेरीचा! पण हे पत्ते माहित असून आपणाला त्याचा उपयोग काय असं कार्मिनला वाटे. कारण आल्बेंत पुजातावर न आल्याबद्दल मुद्दाम एकादा माणूस पाठवून त्याची चौकशी काढण्याइतकी त्याची आणि कार्मिनची दाट गट्टी कुठं होती? तशी ती असती तर आल्बेंतचा पत्ता काढण्यासाठीं तिनं तेंही काम केलं असतं. कदाचित त्याचा शोध काढीत ती स्वतःच त्या दोन्हीही पत्त्यावर जाऊन आली असतीही—

—काय आश्चर्य तरी पहा! एक परका मनुष्य! गिऱ्हाईक या नात्यानं त्या पुजातावर येतो आणि त्या पोरीला आपल्या अबोल्या स्वभावानें जिंकून बसतो. आपणाविषयींचं आकर्षण तिच्या मनांत निर्माण करतो. प्रीतिचें खत तिच्या अंतःकरणांत रुजूं घालतो. हा चमत्कार कशाचा? प्रेमाचा? प्रेम ही इतकी उन्मत्त वस्तु आहे का? प्रेमाला नीति नाहीं का? प्रेम व्यवहार जाणत नाहीं का? एकमेकांच्या परिस्थितीचा विचार न करितां, एकमेकांच्या आवडीनिवडी लक्षांत न घेतां, एकमेकांचा सामाजिक दर्जा न पहातां, अंतःकरणाच्या एका गुप्त कप्प्यांत जागृत झालेला हा उन्माद म्हणजेच प्रेम का? कुणि सांगावं! कदाचित् त्याचंच नांव प्रेम असेलही! कांहीं का असेना, पण आल्बेंतकडे तिचा जीव ओढ घेत होता इतकं खरं! मग त्याला कुणि प्रेम म्हणो, कुणि उन्माद म्हणो, कुणि पाप म्हणो, कुणि पुण्य म्हणो—

वेळ भराभर निघून जात होता. मार्केटभर लोकांचा गोंगाट सुरू होता. सूर्य डोक्यावर आला होता. संतानच्या पुजातांतून लोक जेवण उरकून बांहेर पडत होते. कुणि नुकतेच आंत शिरत होते. कार्मिन

नित्याप्रमाणें गल्ल्यावर बसली होती. जवळच्या नंदनगोळीच्या एका झाडाखालीं वेड लागलेली एक चांभार जातीची बाई कलिंगड खात बसली होती. तेथून थोडयाशा अंतरावर गाईचं मांस विकण्याचं एक दुकान होतं. दुकानाबाहेर पडलेलीं हाडं चघळण्यासाठीं कांही हाडकुळी कुत्रीं तिथं गोळा झालीं होतीं. विकायला आणलेली मासळी खपून गेल्यामुळें रिकाम्या टोपल्या डोक्यावर ठेऊन कांहीं नुस्तेंकरणी घरच्या दिशेनं चालल्या होत्या.

तोंच तोफ झाली. बारा वाजल्याचा तो सरकारीरित्या दिलेला इषारा होता. ज्यांना ज्यांना त्या तोफेचा आवाज ऐकूं गेला त्या सर्व क्रिस्तांवानीं बसल्या ठिकाणावरून उठून व चालतांना अकस्मात थांबून हाताच्या आंगठ्याचं बोट, तोंड कपाळ व छाती यांना भिडवून तोंडावाटे कांहींतरी मंत्र म्हणत भक्तिभावानें देवाची प्रार्थना चालविली—



# शिरगांवची जत्रा

८

वसंत ऋतूच्या आगमनानं यौवनसंपन्न दिसणाऱ्या लोभनीय वनश्रीप्रमाणें दुर्वतनाचा सशर्त त्याग केल्याच्या ध्येयनिष्ठ जाणिवे-मुळें बतूच्या पूर्व वर्तनांत झालेला पालट निःसंशय शोभायमान होता. अपकीर्तिनं डागाळलेल्या माणसाला जगानं आपलं कोडकौतुक करावं असंच नेहमीं वाटत असतं. आपणाविषयीं लोकांनीं वेळोवेळीं काढलेले तिरस्करणीय सूर ऐकून त्याचे कान इतके कांहीं किटलेले असतात कीं, घोड्याची लीद भरणाऱ्याला एकाद्या सुगंधी पुष्पाची तीव्रतेनं जाणिव व्हावी, तद्वत जगाच्या निर्भेळ स्तुतीस पात्र ठरण्याइतपत आपल्या प्रचलित जीवनांत कांहींतरी चमत्कार घडवून आणण्याची त्याला उत्कंठा लागलेली असते. तो त्या बाजूनं प्रयत्नही करतो. पण या उत्कर्षाच्या

दिव्योदात्त शर्यतींत सारेच घोडे विजयी ठरतातच असं नाहीं. कित्येक आयुष्याच्या अंतापर्यंत पळण्याचा प्रयत्न करूनही मागंच रहातात. अपयश हेंच त्यांचं गालबोट ठरतं. आशेचा लगाम तुटून जातो. आंधळ्याप्रमाणें चांचपडत जीवन कंठणं एवढाच कार्यभाग अंति त्यांना शिल्लक उरतो. इतकं आहे, तरी भविष्यकालाबद्दल मनुष्यमात्राच्या अंतरंगांत डोकावणारी आस्था त्याला कधीं नष्ट करता येते तर पहा! छे! तें कालत्रयीहीं शक्य नाहीं! मृगजळ आहे म्हणूनच हरीण त्याच्याकडे धांवतं. दिवा दिसतो म्हणूनच पतंग त्यावर झडप टाकतो. आणि भविष्यकाळ आहे म्हणूनच मनुष्य आशावादी बनतो, नाहीं का?

बेतूचंही तसंच झालं. ज्यानें ज्यानें त्याच्या दूषित चारित्र्याकडे विषम नजरेनं पाहून त्याचा वेळोवेळीं उपमर्द केला होता, त्यांना त्यांना आपल्या सद्वर्तनी कर्तृत्वाची चमक दाखवून दिपविण्याचा मानस त्यानं अंतरीच्या फलकावर कोरला होता. सद्गुणांचा संचय करून भाविणीनं देवीच्या पालखीसमोर धरलेल्या चौरीप्रमाणं त्याला आपला जीवनरथ भूषित करायचा होता. कांयसुवच्या समुद्रांतून त्याचं पुनरज्जीवन झाल्यानंतर कोटांतील सिद्धेश्वराला साक्ष ठेवून त्यानं भावी जीवनांत स्थित्यंतर घडवून आणण्याचा निर्धार केला होता.

त्यानंतर पंधरा दिवसांनीं तो पणजी मुक्कामीं निघून आला होता.

येतांच एका मोटारीवर त्यानं क्लीनरची नोकरी धरली. तो श्रमजीवि बनला.

सांताननं पणजींत येऊन मार्केटांत पुजात उघडलं तेंही त्याच सुमारास.

फावल्या वेळीं या पुजातांत जाऊन सांतानची नि कार्मिनची भेट घेणं हा बेतूच्या नित्यक्रमांतील एक न चुकणारा नियम होऊन बसला होता. त्यांच्याखेरीज बेतुला आणि बेतूखेरीज त्यांना करमत नसे. पण पोटाच्या मागं लागल्यामुळें बेतुला केव्हां केव्हां दोनदोन तीनतीन दिवस त्या जिव्हाळ्याच्या मंडळींना भेटणं अशक्यप्राय होई. तो रहायचा ताळगांवला. पणजीपासून हें ठिकाण फारसं दूर नव्हतं. बेतू ज्या मोटारीवर क्लीनर म्हणून नोकरीवर होता तिच्यावर ड्रायव्हर असलेल्या इसमाचें बिऱ्हाड ताळगांवला होतं. त्याच्याचकडे बेतू निजण्याउठण्याला असायचा.

आज शिरगांवची जत्रा ! दर वर्षाप्रमाणेंच 'धोंड' या नात्यानं बेतू त्या जत्रेला जाण्यासाठीं ताळगांवहून पणजीला आला होता. तिथून होडीनं तो शिरगांवला जाणार होता.

त्यापूर्वीं सांतानला व कार्मिनला एकदांचं भेटून यावं म्हणून तो मार्केटच्या बाजूनं वळला.

वेळ सकाळची होती.

तो गेला तेव्हां कार्मिन पुजातावर एकटीच होती. वडील बाजार खरेदी करायला गेला होता.

बेतूनं पुजाताबाहेर उभा राहूनच गल्ल्यावर बसलेल्या कार्मिनला हटकलं. तो कांसोटा मारून कोरंकरकरीत धोतर नेसला होता. त्याच्या अंगांत सफेत पैरण होती. गळ्यांत लाल रंगाचा रेशमी रूमाल बांधला होता. डोक्यावर टोपी नव्हती. हातांत बेत होतं. त्याला लोकरीचे गोंडे व फुलं लटकत होतीं. पायांत मालवणी वहाणा होत्या. तो व्रतस्थ होता.

कोणत्याही भ्रष्टकारापासून अलिप्त रहाणं त्याला क्रम प्राप्त होतं. एवढ्याचसाठीं तो पुजाताच्या आंत शिरला नाहीं. त्यानं कार्मिनलाच बाहेर बोलावून घेतलं. बेतूला त्या विशिष्ट पेहेरावांत कार्मिन आज पहिल्यांदाच पहात होती. त्यामुळें त्याच्याकडे आश्चर्यानं पहात तिनं त्याला विचारलं—" शिरगांवला चाललास होय ?"

" हं ! येतेस तूं ?—"

" आलें असतें ! पण तूं धोंड नसतास तर—"

" म्हणून काय झालं ? त्यामुळें तुला काय हरकत आहे यायला ?—"

" समज, मी आलें तर तुला माझ्या संगतींत कसं बरं रहातां येईल ? तूं धोंड असल्यानें तुला तुझ्या कार्याकडे विशेष लक्ष द्यावं लागणार ! अशावेळीं मला कुठं संभाळीत बसणार तूं ? बरं मी पडलें बोलून चालून बाईमनुष्य ! तिथं एकटं फिरणंही धोक्याचंच ! तशांत मी पूर्वीं कधीं त्या गांवचं तोंड पाहिलेलं नाहीं. मला काडीचीहि माहिती नाहीं त्या गांवाची. वास्तविक, फार वर्षांपासून मी ही जत्रा डोळ्याखालून घालीन म्हणते. तिथं आगींतून चालत जातात म्हणे धोंड लोक. तेवढंच मला पहायचं होतं—"

" आली तुझी अडचण माझ्या ध्यानांत. पण मला आधीं हें सांग, तुला खरंच का यायचंय जत्रेला ? तसं असेल तर आमचा एक गांववाला चहाचं दुकान घेऊन जातो तिथं, त्या दुकानांत करीन कीं मी तुझी उठण्याबसण्याची सोय ! मग चालतेस माझ्याबरोबर ? जत्रा संपली कीं येऊं परत पणजीला—"

कार्मिनने विचार केल्यासारखं केलं. ती म्हणाली "गेल्या आठवड्यांत तूं इथं आलास, पण याविषयीं एक चकार शब्दही बोलला नाहीस तूं माझ्याशीं. त्यावेळीं जर का तूं मला याची थोडीशी कल्पना आणून दिली असतीस, तर जावं कीं न जावं याबद्दल विचार करायला मला केवढा तरी अवधि मिळाला असता. तयारी करण्यासाठीं धांवपळ करावी लागली नसती—"

"माझ्या लक्षांतच राहिलं नाहीं तें! मला तरी काय माहित तूं शिरगांवला येणार आहेस हें? बरं मग काय म्हणणं आहे तुझं आतां? चलतेस तर लवकर तयारी कर! मी होडींतून जाणार होतो. तूं येतेस तर आपण मोटारीतनं जाऊं —"

तितक्यांत सांतान बाजार खेरदी करून तिथं आला. थोडावेळ त्या तिघांत बोलणीं झालीं. कार्मिननं वडिलांना आपण जाऊं का म्हणून विचारलं. तिला नाउमेद करणं सांतानच्या जिवावर आलं. त्यानं आपली संमति दिली. कांहीं वेळानं कपडे वगैरे बदलून व निघायची सर्व तयारी करून कार्मिन बेतूच्या सोबत बाहेर पडली.

तीं दोघं वाफोराकडे आलीं. त्यांत बसून तीं बेतींत उतरणार होतीं. नंतर तिथून मोटारीतनं अस्नोडयापर्यंत जाऊन मग शिरगांवला जाण्याचा त्यांचा मानस होता.

तिकिटं काढून तीं दोघं लागलींच वाफोरांत जाऊन बसलीं. वाफोर सुटण्याची शेवटची घंटा वाजली. धक्क्याला बांधून टाकलेला दोरखंड सोडण्यांत आला. वाफोर किनारा सोडून चालूं लागला.

एकदोन मिनिटं गेलीं असतील तोंच एका व्यक्तीकडे कार्मिनचं तितक्यांत लक्ष गेलं. तिच्या उमेदीला पारावार उरला नाहीं. ज्या मूर्तीच्या चिंतनांत तिनं आज कित्येक दिवस घालविले होते तीच व्यक्ति तिच्यापासून चार पावलांच्या अंतरावर आतां उभी होती. क्षणांत त्या व्यक्तीची आणि कार्मिनची नजरानजर झाली. तीं दोघं एकमेकांना उद्देशून हंसलीसुद्धां. तो आल्बेंत होता. शिष्टाचारानुसार तो तिच्याजवळ आला. "कुठं चाललीस?" त्यानं तिला विचारलं. तिनं उत्तर दिलं—"शिरगांवला!"

"वा: ! बरी सोबत मिळाली तुझी—"

"म्हणजे?"

"मींही शिरगांवलाच जातोंय कीं—"

"खरं!"

"खोटं नाहीं सांगत—"

कार्मिनला मनांतून कितीतरी आनंद झाला. आतां आल्बेंतबरोबर आपणास बोलावयास मिळणार, त्याला आपण अनेक प्रश्न विचारणार, त्याची हरकत नसली तर बेतूला सकाळीं भेटतें असं सांगून आजची रात्र आपण आल्बेंतबरोबर जत्रेंतून फेरफटका करण्यांत घालविणार, त्यानं मागितलं तर त्याला चुंबनसुद्धां देणार वगैरे संकल्प ती मनाशीं सोडूं लागली. तिनं त्याला विचारलं—"तूं एकटाच आहेस ना? कीं दुसरं कुणि आहे तुझ्याबरोबर?"

"कां?"

"नाहीं, सहज विचारलं—"

" अगदीं एकटा निघालों आहे मी ही सहल करायला. शिरगांवची जत्रा मी अद्याप पाहिलेली नाहीं. या जत्रेंत कोंकणें आगींतून कसे जातात हें मला पहायचं आहे! बाकीं आम्हां क्रिस्तांव लोकांना आवडण्यासारखं या जत्रेंत दुसरं काय आहे म्हणा! उगीच मजेसाठीं जातो आहे झालं—"

तितक्यांत वाफोराची शिटी वाजली.

बेतींचा धक्का हळुहळू जवळ येऊं लागला.

तोंच कार्मिननं आपल्या सोबत असलेल्या बेतूकडे आंगुलिनिर्देष करून म्हटलं - " मी याच्याबरोबर आलें आहे. फार परिचय याचा नि आमचा—"

आल्बेंतनें क्षणभर बेतूकडे निरखून पाहिलं. तो हंसला. त्यानं विचारलं—" तूं रात्रौ आगींतून जाणार नाहीं?"

" होय सिंज्योर—"

वाफोर धक्क्याला लागला.

बेतू आणि कार्मिन यांच्यांत आल्बेंतची आतां नवीन भर पडली होती. तीं तिघंही वाफोरांतून धक्क्यावर उतरलीं. जवळच मोटरस्टँड होता. मोटरवाले म्हापशें, डिचोली म्हणून घसाफोड करीत होते. त्यापैकींच एका मोटारींत जाऊन तीं तिघं बसलीं.

शिरगांवला जाईपर्यंतचा त्या तिघांचा सगळा खर्च आल्बेंतनं स्वतःच्या खिशांतूनच केला.

तीं शिरगांवात येऊन दाखल झालीं.

जसजसा वेळ जाऊं लागला तसतशी जत्रेला अधिकाधिक गर्दी लोटूं लागली. धक्काबुक्की सुरू झाली. रस्त्यानं नीट चालणं देखील अशक्य होऊं लागलं.

गांवांतील प्रत्येक लहानमोठीं देवळं कागदाच्या रंगीबेरंगी पातका लावून शोभविलीं गेलीं होतीं. तांब्या पितळेचीं भांडीं, खेळणीं, खाजें–लाडू इत्यादि खाद्यपदार्थ, चहा–सोडा वगैरे मालाच्या अवास्तव दुकानांनीं गांवची बहुतेक मोकळी जागा व्यापून गेली होती. म्हारडयांच्या धंद्याला तर एव्हांपासूनच तेजी चढली होती. त्यांनीं विकायला आणलेल्या वळुया, सुपं, कण्णे, पाटल्यो वगैरे जिन्नस वजा केल्यास विशेषतः त्यांच्यापासून हांतऱ्या विकत घेण्याकडेच गिऱ्हाईकांचा ओढा दिसत होता.

याच हांतऱ्यामुळें जत्रेच्या निमित्तानं या गांवांत पायधूळ झाडणाऱ्या स्त्री-पुरुषांच्या विकारवश प्रणयाला प्रतिवर्षीं ऊत येत असतो. भुंगे आणि फुलं यांची जवळच्या डोंगरपठारावर निलाजरी गट्टी जमून त्या उभयतांकडून अनीतीचं कोडकौतुक केलं जातं. देवाच्या पवित्र द्वारीं श्रद्धेला काळिमा फांसणाऱ्या या कृत्यांनीं वातावरणांत गढुळता निर्माण होते—

उन्हं निघून गेलीं होतीं.

धोंड लोकांच्या झुंडीच्या झुंडी स्नानासाठीं तळीकडे जात होत्या. बेतूही तिथं जाण्याची घाई करूं लागला. त्यानं कार्मिनला खूण करून एका कडेला बोलावून घेतलं. तो कुजबुजला—"आतां अधिक वेळ तुमच्या सहवासांत घालविणं शक्य नाहीं! मला तळीवर जाऊन स्नान

उरकून घ्यायचं आहे. तिथून देवळांत गेलं पाहिजे. पुन्हा होमकुंडाकडे आलं पाहिजे. मग तूं आतां काय करतेस? सकाळीं पणजीहून इकडं येतांना मी तुला म्हणालों कीं येथील एका गांववाल्याच्या चहाच्या दुकानीं तुझी बसण्याउठण्याची सोय करतो म्हणून. तें दुकान इथून फारसं दूर नाहीं. तूं सांगत असल्यास मी त्याची आणि तुझी ओळख करून देतों. म्हणजे वाटेल तेव्हां तुला तिथं जाऊन बसतां येईल. कुठंतरी बसायला ठिकाण हें तर पाहिजेच ना?"

कार्मिनला त्याचं तें म्हणणं तेव्हांच पटलं. तिनं त्यासंबंधीं आल्बेंतला विचारलं. तो म्हणाला—"अशी कुठं सोय होत असेल तर त्यांत वाईट काय आहे?"

ठरल्याप्रमाणें बेतू आपल्या त्या दोन्हीही सोबत्यांसह लागलीच दुकानावर गेला. त्यानं तिथं गांववाल्याला काय सांगायचं तें सांगितलं. आल्बेंत व कार्मिन यांना त्यानं आगाऊ आश्वासन दिल्याप्रमाणें त्यांची तिथं बसण्याउठण्याची सोय केली. आणि आपण पहांटेच्या सुमारास तुम्हाला येथें येऊन भेटतों अशी त्यांना सूचना देऊन त्यानं त्या उभयतांचा निरोप घेतला.

चहाच्या दुकानाच्या मागील बाजूला एक रिठ्यांचें झाड होतं. त्याच्या मुळाशीं रिकाम्या झालेल्या कांहीं सोडाच्या पेट्या दुकानदारानें एकावर एक याप्रमाणें रचून ठेवल्या होत्या. त्यापैकीं एक पेटी जमिनीवर ठेवून आल्बेंत तीवर कार्मिनसह बसला. तो त्यावेळीं आपल्या मिलिटरी युनिफॉर्ममध्यें होता. कार्मिन त्याच्या कोटाच्या एका बटणाशीं तितक्यांत लगट करीत म्हणाली—" गेल्या कांहीं दिवसांपासून तूं पुजातावर

जेवायला येण्याचा बंद झालास. त्या मुदतींत मी नाहींतरी तुझी कितीदां तरी आठवण काढली असेल ! मला वाटलं तूं आजारी असशील—"

"नाहीं मी दीड दोन महिने तुमच्या पुजातावर नियमानें जेवायला येत होतों, त्याला तसंच कारण होतं. गेल्या पावसाळ्यांत आमच्या अस्नोडेंच्या घरावर माड पडून त्याची एक भिंत व छप्पर मोडून पडलं होतं. तें दुरुस्त करायला म्हणून माझी 'मांय' तिथं गेली होती. तिच्या त्या गैरहजेरींत मला रांधून वाढण्यासारखा घरांत दुसरा मनुष्य कुणी नव्हता. म्हणून तुमच्या पुजातावर जेवायला येत होतों. ती परत येतांच गरज संपली. साहजिकच तुमच्या बाजूनें येणंही बंद झालं—"

जवळजवळ तीं अशारीतीनं तिथं अर्धा तास बोलत बसलीं होतीं. नंतर तीं दोघं दुकानांतून बाहेर पडलीं. त्यारात्रीं त्यांनीं जेवण घेतलं नाहीं. कांहींतरी खाऊन त्यांनीं ती रात्र मारून नेली.

रात्रौ होमकुंडांत भडकलेल्या आगीच्या ज्वाला दूर उभं राहून त्या उभयतांनीं नजरेखालून घातल्या. कांहीं वेळानं थोंड लोक त्या आगींतून चालून जातांना त्यानीं पाहिलं. तें 'इप्रित' पाहून त्यांनीं आश्चर्यानं तोंडांत बोटं घातलीं—

पहांट होण्याच्या सुमारास जत्रेंतील गर्दी हळुहळू कमी होऊं लागली. बेतू चहाच्या दुकानीं आला. पण तिथं येऊन पहातो तों कार्मिन आणि आल्बेत त्याला कुठं दिसेना. त्यानं दुकानदाराकडे त्यांच्याविषयीं चौकशी केली. तेव्हां त्याचा तो गांववाला चेहऱ्यावर मिस्कील हास्य खेळवून उत्तरला—"तूं येथून गेल्यानंतर अवघा अर्धा तासच इथं होतीं.

तदनंतर मी अद्यापि कांहीं त्याचं तोंड पाहिलं नाहीं. त्यांना काय? बसलीं असतील कुठंतरी एकांतात एकमेकांना मिठ्या मारीत—"

बेतूला मोठाच पेंच पडला. त्याची मति चलबिचल झाली. तो गांगरून गेला. त्याच्या अंतःचक्षुंसमोर अनेक प्रश्नचिन्हांनीं गर्दी करून सोडली.

—पण त्या मनःस्थितींत त्याला अधिक वेळ घुटमळत रहावं लागलं नाहीं—

तो आला त्याच्यामागून १५।२० मिनिटांनीं आल्बेंत आणि कार्मिन तिथं आली.

बेतूनं त्या दोघांचंही निरीक्षण केलं.

आल्बेंतच्या खाकी कपड्यांना चुरी पडली होती. त्याचे घारे डोळे जागरणामुळें लाल झाले होते. चेहरा फिक्कट दिसत होता. कार्मिनचीही पण तीच गत झाली होती. तिचे केंस विस्कटले होते. आंबाड्यांत खोंवलेलं गुलाबाचं फूल चुरगळून गेलं होतं. ती थकल्यासारखी दिसत होती—



# वाळूंतील किल्ला

१

आपल्या लग्नाविषयीं कार्मिन मनांतून केवढे तरी मांडे खाई! आल्बेंतसारखा तरुण आणि सुंदर नवरा मुलगा आपणाला पति म्हणून लाभणं हें आपलं केवढं भाग्य! किती मिठ्ठास स्वभाव आहे त्याचा! तो फारसं कधीं बोलत नाहीं! पण तो एकदां बोलूं लागला कीं त्याच्या तोंडून उमटणारे शब्द किती रसाळ वाटतात! त्याचं अंतःकरणदेखिल किती कोमल! याला प्रेमाची भावना असणं शक्य आहे का असा त्याच्याबद्दल प्रथमदर्शनी कुणाचाही ग्रह होईल. पण प्रीतीचं रहस्य तो किती चांगल्यारीतीनं ओळखतो! शिरगांवच्या डोंगरपठारावर झांतरीवर बसल्याठिकाणीं आपण त्याला त्या रात्रीं 'आल्बेंत!' म्हणून हांक मारली, तेव्हां आपला मानस ओळखून उलट

उत्तरीं तो म्हणाला—" किती विचित्र परिस्थितींत आहोंत नाहीं आपण सध्यां ? " आपण त्यावर हंसलें. त्याच्याकडे लाचार दृष्टीनं पाहिलं. पुतळ्यासारखा पुरुष असुनही तो आपल्या उत्फुल्ल विकारांना पायबंद घालण्याचा अजून आंगचोरपणा करीत होता. त्याला त्या स्थितींत रहाणं जेव्हां सर्वस्वी असह्य झालं तेव्हा मात्र त्यानं मला लाज सोडून विचारलं, " तुझा हात मी हातांत घेतला तर तुझ्या प्रेमळ वर्तनाचा मी भलताच फायदा घेतला असं तर तूं म्हणणार नाहींस ना ? "

" आल्बेंत, खरं सांगूं तुला ? तूं मला आवडतोस ! अर्थात् तूं माझा हात आपल्या हातीं घेणं ही गोष्ट मला अप्रिय कशी होईल ? उलट मला त्यांत आनंदच वाटेल " आपण त्याला आपल्या हृदयांतील गुपित समजावून दिलं. आल्बेंतनं चटकन् आपणाला जवळ ओढलं आणि आपला हातही आपल्या हातीं घेऊन दाबला. किती सुखद् संवेदनेनं आपलं मन त्यावेळीं भारलं ! पाण्यांत दगड टाकावा तद्वत आपल्या सबंध शरिरांत अपूर्व अशा नवचैतन्याच्या, विपरीत अशा उन्मादाच्या लहरी निर्माण झाल्या ! कळीचं क्षणांत फुलांत रूपान्तर व्हावं तसं आपलं झालं ! अंधाराला कटांत घेऊन आपण आल्बेंतच्या मांडीवर मान टाकली. होमकुंडांत आगीनं संचार केल्यामुळें थोड्या वेळापूर्वीं बाजूच्या डोंगरपठारावर झालेली अचाट गर्दी हळुहळू ओसरूं लागली होती. तिथंच एका झाडाखालीं हातरीवर बसल्याठिकाणीं आल्बेंत आणि आपण प्रीतीचीं स्वप्नें अंतरींच्या फलकावर चितारीत होतों. उद्यांच्या पुण्यमय कल्पनांवर विसंबून आज पापाशीं सलगींचं नातं जोडीत होतों. आल्बेंतनं आपणास

आश्वासन दिलं—"तुझ्याशीं लग्न करण्याची शिकस्त करीन! देवानं आपले हे मनोरे पुर्णत्वास नेलेच, तर प्रीतीच्या दाट संघटनेवर आपण संसाराचं नंदनवन बनवूं! भिऊ नकोस—"

या एकाच स्मृतिपाशानं शिरगांवहून परत पणजीला आल्यावरही तिचं हृदय आल्बेंतकडे ओढ घेऊं लागलं होतं. एक दिवस त्याची नि तिची गांठ पडली नाहीं तर त्या पोरीचं चित्त ठिकाणावर नसायचं. तिच्या प्रीतीचा फुलबाग बहरविणारा तो फुलमाळी होता. तिचं खेडवळ जीवन कलामय करणारा तो कुशल शिल्पकार होता. तिच्या तारुण्याच्या कारंजाला जलसंचय करणारा तो निर्मळ झरा होता. इगर्जेत देवासमोर गुढघे टेंकून मिस म्हणतांनादेखिल ती पोर जितकी तन्मय होत नसे तितकी ती आल्बेंतच्या सहवासांत तन्मय झालेली दिसायची. त्यानं गास्पारतीवर फिरायला चल असं म्हटलं आणि त्याला तिनं नकार दिला असं सहसा कधीं व्हायचं नाहीं.

आज रविवार होता. वेळ सायंकाळची होती. काल आल्बेंतची नि तिची भेट झाली तेव्हां त्या दोघांनीं जिव्हाळ्याच्या एका नाजूक प्रश्नावर अखेरचा विचारविनिमय करण्यासाठीं उद्यां गास्पारतीला जोडीनं जायचं ठरविलं होतं. तदनुसार पुजाताच्या दारांत आल्बेंतच्या वाटेकडे डोळे लावून ती उभी होती. तिनं निळसर रंगाचा रेशमी विस्तिद् आंगांत घातला होता. पावडरचा हात फांसून चेहऱ्याला तजेला आणला होता. पायांत उंच टांचेचे बूट घातले होते. केशकलाप नमुनेदाररित्या सजविला होता. आंबाड्याच्या डाव्या बाजुला सोनचांफ्याचं फूल खोवलं होतं.

—आणि त्याच वेळीं आल्बेंत आपल्या घरीं एका विचित्र पेचांत सांपडला होता—

पुढील आठवड्यांत पणजीहून केंपेच्या कॉमार्कांत आल्बेंतची बदली होणार होती. ही गोष्ट काल जेव्हां त्यानं कार्मिनच्या कानांवर घातली तेव्हां ती पोर क्षणभर बुचकळ्यांत पडली. तिचा धीर खचला. आपल्या आशाआकांक्षा कोलमडून पडतात कीं काय असा तिला संशय आला. तिनं उताविळपणानं आपल्या दोन्हींही हातांनीं आल्बेंतचे खांदे पकडले आणि त्याला गदगदा हालवित ती आतुरतेनं म्हणाली—" तुला आठवण आहे ना ? आपण काजाराबद्दल एकमेकांशीं वचनबद्ध झालों आहोंत ! त्याची पूर्तता आपणाला करायची आहे ! फार मोठी जबाबदारी आहे आपणावर ! तुझ्यावर माझा विश्वास आहे ! मी माझ्या स्वतःच्या आवडीनिवडी लक्षांत घेऊन तुझी निवड केली ! तुला माझं तन-मन अर्पण केलं ! देवाकडे तुला आयुरारोग्य चिंतिलं ! तुझ्यामाझ्या भावी संसाराचीं सुखस्वप्नें रंगविण्यांत मी रात्रीच्यारात्रीं जागून काढल्या ! आल्बेंत सांग ! मला गोंधळ्यांत टाकूं नकोस ! करणार ना तूं माझ्याशीं काजार ?—"

आल्बेंतनें तिला त्यावेळीं उत्तर दिलं तें अतिशय त्रोटक स्वरुपाचं होतं. तो म्हणाला—" कार्मिन, तुझ्याशीं मला काजार करतां आलं तर मी स्वतःला अतिशय भाग्यवान समजेन. पण—"

" पण काय ?—"

" तुझ्याप्रमाणेंच मायेचा एक दुसरा पाश माझ्यामागें आहे—"

" कुणाचा ? "

" मला जन्म देणाऱ्या मांयचा ! तिची संमती घेऊनच मला तुझ्या-माझ्या संसाराचा पट मांडायचा आहे ! तिचा रुकार मिळाला कीं आपलं काजार निश्चित झालं असं समज—"

" आणि तिनं हरकत घेतली तर ?–"

" मला निरुत्तर करण्याचा प्रयत्न करूं नकोस ! उद्यां मी यासंबंधी मांयकडे बोलणं काढीन ! मग पाहुंया देवानं आपल्या दैवांत काय लिहिलं आहे तें–" इतकं बोलून तो निघून गेला होता.

आज ह्या गोष्टीचा कार्मिनकडे जाण्यापूर्वी त्यानं आपल्या मांयशीं परिस्फोट केला. आपल्या नि कार्मिनच्या प्रीतीचा सबंध इतिहास तिच्या डोळ्यासमोर उभा केला. ती कोण, कुणाची, काय करते, कुठं रहाते वगैरे संबंधीही त्यानं तिला माहिती करून दिली. कार्मिनच्या स्वभावाची तोंड फाटेपर्यंत स्तुति केली. आपलं अंतरंग तिच्याशीं खुलं केलं. तो तिच्या उत्तराची वाट पहात राहिला.

कधीं झाली नव्हती इतकी आल्बेंतची मांय त्यावेळीं गंभीर दिसली. ती म्हणाली–" बेटा, प्रेम या भावनेविषयीं मला आदर आहे ! पण तिच्या गोडस प्राप्तिकरितां झटतांना सुसंस्कृत मनुष्यानं खोल विचार करायला नको का ? पुजातासारखा हलक्या प्रतीचा धंदा करणाऱ्या एका अशिक्षित खेडवळाच्या पोरीकडे काजारासारख्या पवित्र बंधनानें जखडण्याइतका तुझ्या घराण्याचा लौकिक सामान्य आहे का ? तुझा बाप कापितांव होता. त्यांच्या हुद्याला व नांवाला साजेलसंच वर्तन तूं करायला नको का ? त्यांची स्मृति विसरून तूं केलेला एकादा अपराध

मला कायमचा जाळीत राहील! म्हणून म्हणते तूं आपल्या संस्कृतिला जपलं पाहिजे—"

आल्बेंतला तिचं हें व्यावहारिक म्हणणं पटलं नाहीं असं नव्हे! पण कार्मिनकरितां आपल्या घराण्याच्या नांवलौकिकावर, संस्कृतीवर पाणी सोडायला तो तयार झाला होता! त्याच्या अंतःकरणाचा तो मोठेपणा विषमतेच्या तराजूनें मापण्याइतका पोकळ नव्हता! स्वार्थी दृष्टीनं ती प्रीतीची रास उधळून लावण्याइतकी टाकाऊ नव्हती—

—पण—

या 'पण'नेंच आल्बेंतच्या मनाचा कोंडमारा केला. दोन माया-पाशांत गुरफटलेली त्याची मति धुंद बनली. 'माता कीं पत्नी?' हा प्रश्न असंख्यवेळां त्यानं आपल्या मनाला विचारला. क्षणापूर्वी क्षितिजावर गोळा झालेले नवे ढग हळुहळू नामशेश होण्याच्या पंथास लागले. आल्बेंत घर सोडून रस्त्यावर आला—

लागलीच तो कार्मिनकडे आला. ती दृष्टीस पडतांच त्यानं हंसण्याचा प्रयत्न केला. तीहि हंसली. 'निघूं या ना आपण?' तिनं विचारलं. 'चल!' त्यानं खुणेनं फर्मावलं. तीं पुजात सोडून रस्त्यावर आली. हॉस्पिटलला वळसा घालून त्यांनीं कांपालचा रस्ता धरला. तिथून तीं दोघं गारपारतीला जाणार होतीं. रस्त्यांत त्यानं आपल्या अंतरंगांतील घडामोडीसंबंधीं तिच्याशीं एक ब्रही काढला नाहीं. भलत्याच विषयावर बोलणें काढून त्यानें वेळ मारून नेली.

कार्मिन तो काय सांगतो हें ऐकायला अतिशय आतुर झाली होती. गारपारतीवर येऊन त्या उभयतांनी किनाऱ्यावरील वाळूवर

बैठक मारतांच त्या पोरीनं त्याला विचारलं—"आतांतरी सांगशिल सगळं ?"

तरीहि आल्बेंत बोलला नाहीं.

तो बसला होता त्याच्या डाव्या व उजव्या दिशेनं दोन डोंगरटेकड्या होत्या. त्यापैकीं एकीवर गव्हर्नरसाहेबांची काबची पॅलेस व दुसरीवर आग्वादचा भव्य किल्ला होता. समोर आपल्या अविस्मरणीय शक्तीचे प्रयोग करण्यांत मग्न असलेल्या विशाल सागराच्या भावनाप्रधान लाटा, त्या शेजारच्या दोन्हींही टेंकड्यांच्या पायथ्याशीं असलेलं आपलं अनेक दिवसांचं सख्य पाहाणाऱ्याला गर्जून सांगत होत्या. क्षितिजाच्या बाजूनं तीन शिडांचे एक गलबत मुरगांव बंदराकडे तोंड करून चाललं होतं; त्यावर नजर खिळवून आल्बेंत खिन्न चित्तानं बसला होता. त्याच्या-मागील बाजूला किनाऱ्यावर रांगेनं उभ्या असलेल्या माडांपैकीं एका माडावर सूर काढण्याच्या तयारीनं एक रेंदेर नुकताच वर जात होता.

त्याच वेळीं बसल्या ठिकाणीं जवळच एक रेतीची रास उभारून कार्मिन त्याचा किल्ला बनविण्यांत गर्क होती.

आपल्या प्रश्नाला तितक्यांत आल्बेंतकडून उत्तर न मिळालेलं पाहून तिनं त्याला विचारलं—" तूं असा स्तब्ध का ? बोलत का नाहींस ? "

" काय बोलूं ? "

" आल्बेंत, असं काय करतोस तूं ? तुला कार्मिनची निराशा करायची आहे का ? तूं माझा होऊं शकत नाहीं असं का तुला सांगायचं आहे ? मी सुगंध हुंगण्यासाठीं म्हणून हातीं घेतलेलं फूल कागदाचं होतं, याचा प्रत्यय तर तूं मला आणून देणार नाहींस ?

बोल ! तुझ्या अंतरंगांत काय दडलेलं आहे हें तर मला एकदाचं पाहूं दे ! तूं जितकं जितकं माझ्यापासून सत्य लपवित आहेस तितकी तितकी तुझ्या या अबोल वर्तनाची मला भीति वाटते ! आल्बेंत, तुला आठवतं ? काजार ही आपल्या प्रीतीची आपण अत्युच्च अशी कसोटी ठरविली होती. संसाराचं क्रीडांगण थाटून तिथं खेळीमेळीनं वागडण्याचें आपण मनाशीं एक मोठं कल्पनाचित्र रंगविलं होतं. एकमेकांना न विसरण्याची शपथ वाहिली होती. तूं आतां 'होय' म्हटल्यानं या सर्व मनोऱ्यांची पूर्तता होणार आहे. अन् तूं नाहीं म्हटलंस तर करडाच्या राशीवर जशी आगीची कीट पडावी तशी माझ्या भावी आयुष्याची गत होणार आहे ! तुझ्या प्रीतीच्या काजव्यामागें लागलें असतांना तो हाताला लागण्याऐवजीं उलट वरवर जाऊं लागला तर तुझ्या कार्मेनची स्थिति किती केविलवाणी होईल याची तुला कल्पना आहे ? कदाचित तेवढ्याचसाठीं मी वेडी होईन ! कदाचित झुरून झुरून मरेन !! आत्मघात करीनसुद्धां—"

कार्मेनचा वाळूंतील किल्ला बांधून पुरा झाला होता. वेळ भरतीची होती. समुद्राच्या पाण्याची रेघ हळुहळू त्या किल्ल्याच्या दिशेनं पुढें सरकत होती. 'तिन्हीसांजा झाल्या नव्हत्या; पण त्यांच्या पैजणांतील घुंघुरांतून पृथ्वीतलावर निनादणारे झंकार कानाला नुकतेच स्पर्श करूं लागले होते. होणारं होऊन गेलं होतं. आल्बेंत नि कार्मेन अतिशय खिन्न दिसत होतीं. तीं दोघंही बसल्या जागेवरून उठलीं. निघतांना कार्मेननं एकवेळ त्या वाळूंतील किल्ल्याकडे पाहिलं. क्षणांत लाटांकडे दृष्टि वळविली. आणि दोन्हीं हाताच्या तळव्यांनी त्या पोरीनं आपला चेहरा झांकून घेतला—

# चुडीचा प्रकाश

## १०

सांतानचं आपणाकडे असं काम तरी काय आहे, याचा बेतुला कांहीं केल्या उलगडा होईना. आज कामावरून सुटतांच तो सांतानच्या पुजातावर आला होता. त्यावेळीं कार्मिन गल्ल्यावर बसलेली त्याला दिसली नाहीं. तिच्याविषयीं बेतूनं ज्यावेळीं सांतानशीं चौकशी केली तेव्हां तिची प्रकृति आज नीट नसल्यामुळें ती आज बिऱ्हाडींच पडून आहे असं त्याच्याकडून त्याला उत्तर मिळालं. पुजातापासून बिऱ्हाड फारसं दूर नव्हतं, त्यामुळें आपण तिथं जाऊन कार्मिनची भेट घेऊन यावं असं बेतुला क्षणभर वाटलं. त्यानं सांतानला तसं बोलून दाखविलंसुद्धां. तेव्हां सांतान त्याला म्हणाला–"थोडा दम धर! माझं तुझ्याशीं थोडं महत्वाचं काम आहे! केव्हांपासून मी तुझी वाट पहात होतों! तुला वेळ आहेना? जरा आपण बाहेर जाऊन येऊं या—"

" चला ना—"

सांतान त्याचपावलीं आंत गेला. अजून आठ वाजले नव्हते. बाहेर अंधार मी म्हणत होता. रस्त्यांत इलेक्ट्रिक दिवे पेटले होते. नुकतंच एक गिऱ्हाईक पुजातांत जेवायला आलं होतं. तें टेबलाजवळ जाऊन बसतांच पुजातांतील एका नोकरानें त्याच्यापुढें जेवणाची बशी आणून ठेवली. तितक्यांत आंगांत कोट चढवून सांतान बाहेर आला. क्षणांत नोकराला जवळ घेऊन त्याच्या कानांत तो कांहींतरी पुटपुटला. लगेच बेतूसह पुजात सोडून रस्त्यावर आला—

कांहींसं पुढं गेल्यावर रस्त्यावरील एका दारूच्या दुकानांत शिरण्याचा सांतान प्रयत्न करूं लागला. बेतुलाही त्यानं आंत येण्याविषयीं सुचविलं. पण त्यानें त्याची ती सूचना आभारपूर्वक नाकारली. तेव्हां बेतूकडे आश्चर्यानें पहात सांतान म्हणाला—" म्हणजे ? "

" मी दारूला शिवायचं नाहीं असं ठरविलं आहे !"

" कधींपासून ?"

" फार दिवस झाले—"

" असं का बुवा ?"

" कोणतीच वाईट गोष्ट यापुढें करायची नाहीं, असा मी निश्चय करून चुकलों आहे ! जवळजवळ प्रतिज्ञाच केली आहे म्हणाना—"

" तसं असेल तर मी माझी सूचना मागें घेतों ! तुझ्या प्रतिज्ञेआड येण्याची माझी इच्छा नाहीं—" इतकं बोलून सांतान एकटाच समोरील दुकानांत शिरला.

बेतू बाहेरच उभा होता.

सांतान परत बाहेर येतांच ते चालूं लागले. बोलत बोलत ते जवळच्या नदीकिनाऱ्यावरील एका बांकड्यावर येऊन बसले. बाकड्याला लागूनच एक नंदनगोळीचं लहानगं झाड होतं. त्याच्या शेजारींच एक इलेक्ट्रिक दिवा जळत होता. त्याच्या प्रकाशाचा झोत त्या झाडाच्या शेंड्यावर पसरल्यानं थोडं लांबून पहाणाऱ्याला जणूं त्या झाडाला आग लागल्याचा क्षणभर भास होई. कांहीं अंतरावरून तिथं पहाऱ्यावर असलेला सोल्दाद मंद पावलं टाकीत त्याबाजूनं चालून येतांना दिसत होता. समुद्राकडे तोंड करून बेतू व सांतान बसले होते. पैलतीरीं वसलेलीं वेरें व बेतीं हीं छोटीं बंदरें आसपास लुकलुकणाऱ्या दिव्यांमुळें दुरून अतिशय शोभिवंत दिसत होतीं. वेरेंची शेवटची फेरी करून नदीचं पाणी कापीत वाफोर बेतींकडे येत होता. रैजमागच्या दीप-गृहांत लाल बत्ती मिणमिणत होती.

सांतान बेतूशीं आपलं अंतःकरण खुलं करून बोलत होता. आवाजाला कंप सुटल्यामुळें तोंडावाटे बाहेर पडणारे त्याचे शब्द कारुण्यपूर्ण भासत होते. वाऱ्यावर शिंपडलेल्या सांवरीच्या कापसासारखी त्याची गत झाली होती. तो बोलत होता—"तोंड बाहेर काढायलाही पोरीनं वाट टेवलेली नाहीं ! मागं दुमिंग भाटकारानं केलेल्या कृत्यामुळें आधींच आपल्या अब्रुला थोडंसं गालबोट लागून राहिलंच आहे. आजच्या प्रसंगानं त्याचा अधिक विस्तार होणार म्हणून भीति वाटते ! कशी पोरीची बुद्धि फिरली देव जाणे ! मला त्या आल्बेंतचा संशय येतो ! कार्मिन तर कांहीच कबूल करीत नाहीं ! आणखी ५।६ महिन्यांनी ती आई होणार ! काय करूं ? गळा दाबून जीव का घेऊं तिचा ?

बेतू, देवानं केवढी मोठी शिक्षा केली मला ही ! ! मी असं कोणत पाप केलं होतं ? जगांत आजवर सन्मार्गानं वागलों त्याचं हें मला प्रायश्चित्त का ? एकुलती एक पोर ! माझी तिच्यावर केवढी भक्ति ! ! केवढा विश्वास ! ! ! त्याचा तिनं अशा रीतीनं फायदा घ्यावा ना ?—"

बोलतांना सांतान अकस्मात थांबला. त्याला चढली होती. बोलण्याला लगाम घालणं त्याला अशक्य होत होतं. त्याचे डोळे अश्रुंनीं भरून आले होते. डाव्या हाताच्या मनगटानं तो ते पुसूं लागला.

बेतुला म्हाताऱ्याची दया आली. त्यानं त्याला धीराचे शब्द ऐकविले. तो म्हणाला—" रडून काय होणार आहे आतां ? कांचेचं भांडं पायांवर पडून फुटलं ! तें पूर्ववत दुरुस्त होणं शक्य नाहीं ! फार तर त्यामुळें पायाला झालेली जखम आपणाला भरून काढतां येईल ! पण त्याला ' रडणं ' हा उपाय नव्हे ! त्यासाठीं कांहींतरी तोड शोधून काढली पाहिजे—"

"—पुष्कळ विचार करून पाहिला आज त्या बाबतींत ! पण छे ! सगळीकडे धुकें पसरल्यासारखं दिसतं ! त्यांतून मार्ग काढण्याची आशा दिसत नाहीं—"

बेतुला मागं आपणाला डोंगरपठारावर साप चावल्याची तितक्यांत आठवण झाली. त्याप्रसंगीं सांतान व कार्मिन यांनीं मनांत घेतलं नसतं तर आपल्या हाडाचा एकादा तुकडाही आज कुणाला पहायला सांपडला नसता, या जाणिवेनं त्याचं अंतःकरण भरून आलं, त्याच्यांतील उपकारी-वृत्ति जागृत झाली. त्याच्या दयाशील भावनेला कोंब फुटला. त्याला सांतानचा कळवळा आला. कार्मिनविषयीं सहानुभूति वाटली. आपणाला या बापलेकीला अशा परिस्थितीत कांहीं सहाय्य करणं शक्य आहे

का ? असलं तर तें कोणत्या मार्गाने वगैरे विषयीं डोकं खाजवून तो विचार करूं लागला. या विचारांतूनच त्याच्या मनांत एका विचित्र कल्पनेचा त्यावेळीं जन्म झाला. क्षणभर त्यानं त्या कल्पनेकडे स्वतःच उपहास बुद्धीनं पाहिलं. डबक्यांतील गढूळ पाण्यांत थप्पल मारून बसलेल्या रेड्याचं चित्र त्याच्या दृष्टीसमोर तितक्यांत उभं राहिलं. त्याला वाटलं या रेड्यासारखाच आपला हा दयेचा प्रकार होईल ! कार्मिनच्या पापावर पडदा पाडण्यासाठीं आपण कितीही मोठा स्वार्थत्याग केला तरी लौकिकदृष्ट्या त्याची किंमत गुरें खाऊन चव्हाट्यावर फेकलेल्या चारा-इतकीच ठरणार ! क्षणभर त्याच्या मनाची चलबिचल झाली. सद्‌वर्तनाची उपासना करण्यासाठीं आपल्या आजवरच्या चारित्र्यांतील एकूण एक दोषांचं उच्चाटन करण्याच्या ध्येयप्रेरीत मनिषेनं तो आपला आजचा जीवनक्रम हांकीत होता. त्याला गालबोट फांसावं कीं लौकिकाला कमी लेखून निरपेक्ष बुद्धीनं कार्मिनविषयींचा जिव्हाळा व्यक्त करावा हें गुढगुंजन तो मनाशीं उकलूं लागला. त्याच्या श्रद्धेचा कौल अंती कार्मिनच्या बाजूनं पडला. पण हा कौल कार्मिनला संमत होईल का ? सांतान या गोष्टीला महत्त्व देईल का ? नाहींतर धर्म करतां कर्म उभं रहायचं ! कोल्हा समजून त्या बापलेकीकडून बिचाऱ्या कुत्र्याची शिकार व्हायची ! ही शंका नदीवरील जोरगतीच्या भरतीप्रमाणें वेतूच्या अंतर्यामीं तीव्र गतीनं बळावत चालली.

तोंच वाढत्या कैफामुळें तोंडावाटे निघणाऱ्या कांपऱ्या शब्दांत सांतान आवेशानं बरळूं लागला—" मूर्ख पोर ! बकऱ्यासारखी काऽपून काढीऽन ! अऽपऽपराध कराऽवा तिनं आऽणिऽ मी अश्रुऽ

गाऽळाऽवेऽ! वाऽरेऽवाऽ! आजऽवरऽ फुलासाऽरखी झेललीऽ! जिऽवाऽपलिऽकडे जपलों! त्याचं हें फऽळऽ का? नाऽदाऽन कारऽटीऽ! माऽझ्याऽ तोंऽडाऽला डांबऽर फांऽसलंऽ!! मऽरती तर आऽज अऽब्रुनें जगऽलोंऽ असऽतोंऽ—"

"—सांतानबाबा, तुम्ही हें काय बरळतां? चुकली तरी कार्मिन तुमची मुलगी आहे—"

"ऽआणिऽ मी तिऽतिचाऽऽ बाऽप आऽऽहे!! म्हऽणूऽनऽऽ काऽय झाऽझालंऽऽ!! त्याऽऽत्या डुकरीऽणीला अक्कऽल नऽनव्हती का? कुकुबाऽऽळ काहोऽऽती ती? कऽपाळऽऽकरंटीऽऽऽ!! लाऽऽळ-घोऽऽटीऽऽऽ—"

"नका तिला असं उणं बोलूं! सांतानबाबा, चुकलेल्याला देवसुद्धां क्षमा करतो! मग तुम्ही तर बोलून चालून मनुष्य! शिवाय कार्मिन तुमच्या रक्ताचा गोळा आहे! तुम्हीच तिला असं कठोरतेनं बोलूं लागला तर तिचं सांत्वन कुणि करायचं बरं! तिला कुशींत धरून तिचे अश्रु पुसायला तिची मांयतरी जिवंत आहे का? ती असती तर माझ्याऐवजीं आज तुमची समजूत पाडण्याची कामगिरी तिनंच केली असती. पण कार्मिन तितकी भाग्याची नाहीं! बरं तें जाऊं द्या? तुम्हीं असं करतां?—"

"सांऽसांग, काऽय कऽऽरूं?"

"मी स्पष्ट विचारलं तर राग नाहींना येणार तुम्हाला माझा? तुमची इच्छा असली तर कार्मिनचं पाप पचविणं आपणाला अशक्य नाहीं! त्या बाबतींत थोडासा आडमार्गाचा आपणाला अवलंब करावा

लागेल इतकंच! याला तयारी आहे तुमची? वाटल्यास ती तोड मी तुम्हाला सुचवितो. पहा विचार करून—"

"बेऽतूऽऽ!"

"सांतानबाबा, संकट टाळण्यासाठीं तुमच्या कार्मिनशीं मी काजार करायला आपली कांहीं हरकत आहे?—"

"कोऽण? बेतूऽ! तूंऽतूं माझ्याऽ काऽकार्मिनशीं काजार कऽरणार? खरं? मऽला फसवूंऽ नकोसऽ! शपथऽ घेऽ!! अजूऽन मऽमला खऽरंऽ वाटत नाऽहीं!! माझ्या पोऽटच्या गोळ्याऽसाठींऽतूं एवऽढा स्वाऽर्थऽत्याग करशील?"

"का करूं नये? मागं सर्पदंश झाला तेव्हां तुम्हीं थोडे का कष्ट घेतले आहेत? तुम्हीं मला वांचवलं म्हणून मी आज दिसतो आहे! माझ्या कातडीच्या वहाणा करून तुमच्या पायीं घातल्या तरी मी तुमचा उतराई होणार नाहीं! त्या आभाराची अल्पशी फेड करण्याची ही सुसंधी देवानं मला दिली आहे! तिचा मी दुरुपयोग केला तर माझी गणना पशूंत होईल! अपकीर्ति पत्करूनही कार्मिनच्या पापाचा अर्धा वाटा उचलतांना मला दुःखापेक्षां आनंदच अधिक होईल—"

"पऽण बेतू त्याऽत्यासाठीं तुझाऽ धऽधर्म तुला सोऽडावा लाऽलागेलऽ! तूं ख्रिस्ति झाऽलास तर तुऽतुझीऽ जाऽत तुऽतुला वाळीत टाऽटाकील—"

"—हरकत नाहीं!—मला धर्माचं महत्व वाटावं, जातीचा दरारा वाटावा, असं माझं त्यांनीं आजवर काय हीत केलेलं आहे, म्हणून मी या बेगडी बंधनाची क्षिति बाळगावी? नाहीं, मला हीं बंधनं माझ्या

निश्चयापासून परावृत्त करूं शकणार नाहीं! कारण अंधारांत सांपडलेल्या जिव्हाळ्याच्या माणसांना चुडीचा प्रकाश दाखविण्याचं कर्तव्य मला करायचं आहे—"

सांतानच्या आनंदाला सीमा राहिली नाहीं. तो उठून उभा राहिला. त्याच्या झुकांडया जात होत्या. बेतू त्याला सांवरण्यासाठीं उठला. त्यानं म्हाताऱ्याला घट्ट पकडून ठेवला. पण सांतान त्याला कसली दाद देतोय! तो मोठमोठ्यानं बडबडत होता. गात होता. शेवटीं त्यानं बेतूचा हात आपल्या हातीं घेतला आणि नम्रतापूर्वक म्हटलं-—"Obrigado"



# धोक्याची सूचना

## ११

दारावर टिचकी कुणी दिली हें पहाण्यासाठीं गीता रांधपघरांतू बाहेर आली.

तो पोस्टमन होता.

त्यानं पुढं केलेलं पत्र घाईघाईनं गीतेनं हातीं घेतलं. तिनं त्या पत्रा कव्हर फाडलं. पण तिला वाचायला कुठें येत होतं? ती तें पत्र घेऊ त्याच पावलीं शेजारच्या एका बामणाच्या घरीं गेली. त्याठिकाणीं भालचं नांवाचा एक तरुण पुरुष अभ्यासाचं पुस्तक हातीं घेऊन बल्कावा येरझारा घालीत होता. भालचंद्र हा पणजीच्या लिसेवांतील विद्यार्थ आजची रविवारची सुट्टी गांवी घालविण्यासाठीं तो काल रात्रौ एकोशील आला होता. त्याच्यासमोर हातांतील पत्र धरून गीता म्हणाली—

"भालचंद्रबाब, हे एवढं पत्र वाचून दाखवितां?"

पत्रांत खालील मजकूर होता तो भालचंद्रानें तिला वाचून दाखविला.

ति. आईस, सा. न. वि. वि. कदाचित हें पत्र हातीं पडण्यापूर्वीच तुम्हांला मी कळवित असलेली हकिगत कळली असेलसुद्धां. तसं असल्यास तुम्हीं शक्य तो काळजी घ्यालच. पण कदाचित माझा तो अंदाज चुकीचा ठरल्यास तुम्हांला सावध करावं म्हणून मी हें पत्र मुद्दाम पाठवित आहे.

पूर्वीं पोंबुर्प्याला रहाणारा सांतान नांवाचा एक ख्रिस्तांव पणजीच्या मार्केटांत सध्या एक लहानसं पुजात घालून बसला आहे म्हणे. त्याला त्याच्या दुसऱ्या लग्नसंबंधापासून झालेली कार्मिन नांवाचीं एक सुंदर मुलगी आहे. हिच्याशीं आपला बेतू लग्न करणार असल्याची सबंध कांयसुवभर दाट वदंता पसरली असून ती बहुतेक खोटी नसावी असा माझा नक्की अंदाज आहे. हें लग्न खरोखरीच घडून आलं तर त्यासाठीं बेतुला प्रथम ख्रिस्ती व्हावं लागेल हें उघड आहे. मला तर ही बातमी ऐकून धक्काच बसला. मनांत आलं कीं, त्याचपावलीं पणजीला निघून जावं. बेतुला भेटावं. त्याला दोन समजुतीच्या गोष्टी ऐकवाव्या. धर्मांतर न करण्याबद्दल त्याचे पाय धरावे. पण जेव्हां माझा हा संकल्प मी तिकडच्या कानीं घालून पणजीला जाण्याविषयीं त्यांची संमति विचारली तेव्हां आंगांत वारं भरल्यासारखं करून त्यांनी संताप व्यक्त केला. तेवढ्यानें मी तर नुस्ती नरमलें ! त्यावेळीं बेतूच्या पूर्व कर्मांचा त्यांनीं सतरा वेळां तरी उपहासवाणीने उल्लेख केला. एवढंही करून ते थांबले नाहींत. तर बेतूबद्दल मी सहानुभूतिपूर्वक बोलणं हा देखिल त्यांच्या दृष्टीनें गुन्हा ठरला. त्याबद्दल त्यांनीं मला दोष दिला. माझी कानउघाडणी

केली. मला गाळींची लाखोली वाहिली. मी गप्प राहिलें. त्यानंतर विचार करून मी ओळखीच्या एका इसमाकडून हें पत्र लिहून घेतलं तें तुला पाठविलं आहे. तरी तूं आणि गीता मिळून याचा खल करावा. आणि शक्य झाल्यास बेतुला ख्रिस्ती होण्यापासून परावृत्त करावं, यापेक्षां मी दुसरी अपेक्षा ती काय करणार ?

तुझीच
**तुळशी**

पत्र वाचून पुरं होतांच तें तसंच हातीं घेऊन वेड लागलेल्या माणसाप्रमाणें गीता घरच्या दिशेनें पळत सुटली. ती घरीं आली खरी पण तिचं चित्त कशावरच लागेना. ती आपल्या आईची वाट पहात राहिली.

थोड्याच वेळांत जायु नित्याप्रमाणें तुरत्याची रिकामी टोपली कडेवर मारून घरीं आली. येतांच गीतेनं कांयसुवहून तुळशीचं पत्र आल्याची बातमी व त्यांतील हकिगत तिला सांगितली. तेव्हां कडेची टोपली जायुनं पटकन् कोपऱ्यांत भिरकावून दिली. कपाळावर हात मारून घेतला. आणि वैतागून म्हणाली—"वाटेल तें करूं द्या त्याला ! ख्रिस्तांव होवो नाहीं तर भंगी होवो ! तो आपणाला आणि आपण त्याला व्यवहारीकदृष्टया कधींच मेलों आहोंत–"

पण हें तिचं बोलणं गीतेला मानवलं नाहीं. ती तुळशीच्या मताची होती. बेतुला त्याच्या भावी दुष्कृत्यापासून परावृत्त करण्याबद्दलचा तुळशीनं पत्रद्वारें प्रदर्शित केलेला आशावादच तिला खरा जिव्हाळ्याचा नि कळकळीचा वाटला. म्हणून ती आपल्या आईला म्हणाली—"आवय,

असं म्हणून कसं चालेल ? दादू तुझा पोटचा मुलगा आहे. माझा भाऊ आहे. त्याला मेला असं तोंडानं म्हणणं सोपं आहे ! पण उद्यां खरोखरी तो मेला तर त्याचं दुःख तुला जन्मभर विसरणं शक्य नाहीं—"

"छे, छे ! मला नाहीं मुळींच दुःख होणार ! कारण तो मरायचा बाकी आहे ही कल्पनाच मला पटत नाहीं गीता—" हें बोलतांना तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. ते पुसण्यासाठीं तिनं आपल्या लुगड्याचा पदर डोळ्यापाशीं नेला.

गीतेनं तिला नानापरीनं सांगून पाहिलं. तिची समजूत पाडण्याच आटोकाट प्रयत्न केला. पण गीतेच्या सुचनेप्रमाणें पणजीला जाऊन बेतुला दोन उपदेशाच्या गोष्टी सुनवायला जायु तयार होईना. तेव्हां अखेरचं म्हणून गीतेनं तिला विचारलं—"बरं, तुझ्याऐवजीं मी पणजीला जाऊन दादूची भेट घेतली तर चालेल ?"

या गोष्टीला मात्र जायु कबूल झाली.

दुसरे दिवशीं सकाळच्या प्रहरीं गीतेनं वाफोरांतून पणजीला प्रयाण केलं.

आज दोन वर्षांनीं ती पणजी शहराचं तोंड पहात होती. येथेंच गीतेची सासुरवाडी होती. लग्नानंतर अवघ्या सहाच महिन्यांनीं तिचा कुंकवाचा आधार तुटला. ती बालविधवा झाली. 'उरफाट्या पायाची' म्हणून गीतेची सासू व सासरा तिला अतोनात छळूं लागली. तिला तो जांच असह्य झाला. एक दिवस तिनं त्या घराला कायमचा रामराम ठोकला. ती माहेरी निघून आली.

वाफोरांतून धक्क्यावर उतरतांच तिचीं पावलं मोटारस्टँडकडे वळलीं. तिथं जाऊन तिनं आपल्या भावाची एका शोफरपाशीं चौकशी केली. आणि त्यावेळीं बेतू नक्की कुठं सांपडेल याचा अंदाज तिला लागला. ती त्या शोफरनें सांगितलेल्या दिशेने चालूं लागली.

कांहींसं अंतर तुडवून गेल्यावर गव्हर्नरसाहेबांच्या पणजीच्या पॅलेस-नजीक असलेल्या 'रॅपुब्लिक हॉटेल'च्या दारांत एक मोटरकार उभी होती. तिच्यावर तिची दुरूनच नजर जाऊन खिळली, आणि हीच ती मोटर असली पाहिजे असा जो तिनं मनाशीं त्यावेळीं अंदाज केला तो चुकीचा ठरला नाहीं.

मोटारीच्या पुढील सीटवर दोन माणसं बसलीं होतीं. एक त्या मोटारीचा ड्रायव्हर व दुसरा बेतू. गीता त्या मोटारीच्या अगदीं जवळ गेली तेव्हां कुठं बेतूचं तिच्याकडे लक्ष गेलं. तिला पहातांच तो मोटारींतून तत्काळ खालीं उतरला. तीं दोघं बाजुला गेलीं. बेतूनं थोड्याशा चलबिचल मनोवृत्तींत तिला विचारलं—" गीता, तूं इथं कशी? कधीं आलीस? आवय बरी आहे ना?"

"आहे बरी!"

"कां आलीस?"

"तुला भेटावं म्हणून—"

"मला? इतक्या महिन्यांनीं का तुला माझी आठवण झाली? गीता, घर सोडून गेल्यावर मी मेलों कीं जिवंत आहे यासंबंधीं एक दिवस तरी तूं कधीं कुणाशीं चौकशी केलीस का ग? कीं आवयप्रमाणें तूंही माझ्यावर कायमची रुसून बसलीस?"

" तें सगळं कांहीं मी तुला नंतर सांगेन ! पण मला आधीं हें सांग, तूं चाललास कुठं आतां ?"

" मी जुन्या गोव्याला जातों आहे. आज सकाळीं मुंबईहून दोघे इंग्लेिश गोवें पाहाण्यासाठी आले असून, त्यांनांच घेऊन आमची मोटर आतां जुन्या गोव्याला जाणार आहे. त्यासाठींच तर आम्ही थांबलों आहोंत. कोव्हेंत पहायचे आहेत त्यांना तिथले—"

" पण तूं त्यांच्याबरोबर न गेलास तर चालणार नाहीं का ?—"

" वा, मला न जाऊन कसं चालेल ?"

" मग परत कधीं येणार आहेस तूं ?"

" १–२ च्या दरम्यान—"

" नक्की ?"

" हं ! कदाचित अर्धा तास पूर्वींच येईन पण उशीरां येणार नाहीं–"

" मग देवळाकडे जाते मी महालक्ष्मीच्या. तिथं आपल्या गांवची चंद्रा आहे ना तिच्याकडे मुक्काम टाकतें तूं येई तोंवर. बहुतेक संध्याकाळच्या वाफोरानं परत एकोशीला जाईन म्हणते. पण तूं मला भेटत असशील तरच हो—"

" भेटेन म्हणजे ? इतकाही तुझा माझ्यावर विश्वास नाहीं का ? शक्य असतं तर याच पावलीं तुझ्याबरोबर निघालों असतों—"

" बरं आहे. मग मी जातें चंद्राकडे."

" जा. दोन वाजेपर्यंत मी तिथं येतोंच."

इतकं तीं बोललीं पण बराच वेळ होउनही तीं एकमेकांपासून दूर गेलीं नाहींत. गीतेचें आपणाशीं काय काम असावं हें निश्चितपणें

समजण्यासाठीं त्यानं तिच्याजवळ दोन तीन वेळां खडा टाकून पाहिला. पण गीता कसली वस्ताद! तिनं त्यासंबंधीं त्याला दादही लावूं दिली नाहीं. 'मगच काय तें सांगेन' असं सांगून वेळ मारून नेली. त्या मुदतींत त्यांच्या आणखीही बऱ्याच गोष्टी झाल्या. त्यांत एकमेकांच्या सुखदुःखाचे अनेक प्रश्न येऊन गेले. उभयतांना समाधान वाटलं.

तोंच हॉटेलांतील ते दोघे इंग्रज प्रवासी खालीं उतरतांना पाहून बेतू तिला निरोप देत घाईघाईनं तिच्यापासून दुर झाला. त्याच वेळीं त्यानं तिला विचारलं—"तुला खर्चाला पैसे वगैरे नकोत ना? हवे असल्यास देऊन टाकतों—"

तिनं मानेनंच 'नको' असं सुचविलं. ती निघून गेली.

बेतू चटकन मोटारीपाशीं धांवला. त्यानं मोटरीचा दरवाजा उघडून त्या इंग्रज गृहस्थांना आंत घेतलं. पुन्हां दरवाजा लावून घेतला आणि स्वतः पुढील सीटवर ड्रायव्हरशेजारीं येऊन बसला तो.

त्या इंग्रज गृहस्थांपैकीं एकाच्या हातात कॅमेरा होता. दुसऱ्यानं चष्मा लावला होता. हातीं एक नमुनेदार अशी काठी घेतली होती. तोंडांत पाईप होता. त्या दोघांनीं खाकी कपड्याच्या अर्ध्या पॅंटस व सफेद कापडाची हाततोटकीं शर्टस घातलीं होतीं.

मोटर आतां पाव्यावरून चालली होती.

लाल मातीनं भूषित झालेला तो प्रदीर्घ रस्ता किती सुबक दिसत होता. एका बाजूला नदीचं विस्तृत पात्र व दुसऱ्या बाजूला पिकून पिवळीं झालेली शेतं, झाडांझुडपांतून हळूच वर डोकवणारी आसपासच्या खेड्यांतील गांवठी व सूळच्या नळ्यांचीं घरें, शिंड वर करून निरनिराळ्या

दिशेनं नदींतून चाललेल्या होड्या, मधूनच एखाद्या शेतावरून उडून जाणारें भोंवारीचें थिरें, शहराकडे तोंड करून चिऱ्यांनीं भरून जाणाऱ्या बैलगाड्यांची एखादी रांग वगैरे देखावे परिचितांचेंही अंतरंग खुलवित होते. मग त्या मोटरींतील इंग्रज गृहस्थांना त्या दृश्यांनी मोहिनी घातल्यास नवल काय ?

थोड्या वेळानें मोटर जुन्या गोव्यांत शिरली. एकेकाळीं वैभवशिखरावर तळपणारें तें इतिहासप्रसिद्ध बंदर व गांव आज रणांगणांत मृतप्राय होऊन पडलेल्या शूर वीराप्रमाणें दिसत होतं. सदर गांवाविषयीं त्या इंग्रज मित्रांत त्यावेळीं बोलणीं सुरू होतीं. क्वचित ठिकाणीं ढांसळून पडलेल्या व पुरातन दिसणाऱ्या चिरेबंदी तटांच्या गांवासभोंवताली पसरलेल्या विस्तृत भिंती, लाल मातीचे रुंद व रेखीव रस्ते, पोर्तुगीज पाद्रीस्तांनी बांधलेले टोलेजंग व कौशल्यपूर्ण कोव्हेंत, जटाधारी संन्याशाप्रमाणें रस्त्याच्या-कडेस रांगेनें उभे असलेले प्रचंड वृक्षराज वगैरे निसर्गाचा व मानव-निर्मित अलंकार पहात पहात मोटर रोमच्या 'सेंट पीटर पॅलेस'च्या धर्तीवर बांधलेल्या 'सां कायतानु' मठाच्या भव्य दरवाजासमोर येऊन उभी राहिली. मोटारींतील इंग्रज मित्र तत्काळ खालीं उतरले. त्यांनीं मठांत प्रवेश केला. त्यांच्यामागून शोफर व बेतू आंत गेले. मठांतील भिंती आजवरच्या राजप्रतिनिधींच्या मोठाल्या तैलचित्रांनीं शोभविल्या होत्या. एकंदर मठ फिरून झाल्यावर 'सॅ पात्रियाकाल' हें प्रमुख देवालय व त्याच्या बुरुजावरील मोठी घंटा दृष्टिखालून घालीत ते सर्वजण 'सांफ्रां-सीस्कु' या मठांत गेले. त्यांत अनेक जुन्या मूर्ति मांडून ठेवल्या होत्या. त्या बारकाईनं निरीक्षण करण्यांत त्या इंग्रज गृहस्थांचा बराच वेळ खर्ची पडला.

शोफरला इंग्रजी येत नव्हतं. त्यामुळें त्या इंग्रज गृहस्थांकडे बोलतांना त्याला मोडक्यातुटक्या हिंदीचा आश्रय घेणं क्रमप्राप्त होई. ते इंग्रजही हिंदी चांगलंच जाणत होते. त्यांनीं त्या मठांत प्रवेश केला तेव्हां त्या दोघां इंग्रज मित्रांपैकीं एकानं शोफरला जवळ बोलावून "सेंट झेवियरचं शव याच मठांत असतं नाहीं?" असा सवाल टाकला. त्यावेळीं तें शव 'बों झेजस्' या नांवाच्या मठांत राखून ठेवलेलं आहे, त्याचं दर दहा वर्षांनीं एकदां प्रदर्शन मांडण्यांत येतं, तें पहाण्यासाठीं जगांतील निरनिराळ्या भागांतून ख्रिस्ताचे उपासक व हिंदुस्थानांतील अन्यधर्मीयही कशी गर्दी करून सोडतात, हें प्रदर्शन उघडण्यासाठीं प्रथम रोमहून पोपसाहेबांची अनुज्ञा आणावी लागते, सेंट झेव्हियर अद्यापीहि चमत्कार दाखवितो व असाध्य रोग बरे करतो वगैरे माहिती शोफरनं त्या इंग्रज गृहस्थांना पुरविली.

तदनंतर गांवचे आणखीं कांहीं पुरातन अवशेष दृष्टिखालून घातल्यावर ते प्रवासी मोटरींतून पुन्हां पणजीला आले.

मोटार हॉटेलसमोर येऊन थांबली. भाडं चुकतं झालं. वर शोफर व क्लीनर यांच्या हातीं प्रत्येकीं एक याप्रमाणें दोन रुपये बक्षिसी पडली.

बेतुला तितक्यांत गीतेकडे जायची घाई लागली. त्याबद्दल त्यानं शोफरची परवानगी मिळविली. तो देवळाच्या दिशेनं जायला निघाला.

पण मध्येंच कसल्यातरी विचारानं तो जागच्या जागीं थबकला. त्यानं खिशांत हात घालून आपणाकडे एकंदर किती पैसे आहेत हें पाहिलं. ती रक्कम २ रुपये ९ आणे इतकी भरली. त्या रकमेंत येणारं एकादं लुगडं गीतेकरितां घ्यावं असं त्याला वाटलं. लगेच तो जवळच्या एका

कापडाच्या दुकानांत शिरला. त्यानं सव्वादोन रुपये दराचं एक राखेच्या रंगाचं धारवाडी लुगडं खरेदिलं. आपल्या श्रमाच्या मिळकतीद्वारें कुटुंबांतील एकाद्या माणसासाठीं त्यानं विकत घेतलेली त्याच्या आयुष्यांतील ती पहिलीच वस्तू होती. गीतेला हें लुगडं पाहून किती आनंद होईल! ती तें गांवांतील सगळ्या शेजारपाजाऱ्यांना दाखवून 'दादूनं दिलं आहे हो हें मला!' अशी सर्वत्र जाहिरात करील वगैरे कल्पनाचित्रें त्या लुगड्याचं पैसे चुकते करतांना तो आपल्या मनाशीं रंगवूं लागला. क्षणांत दुकान सोडून तो रस्त्यावर आला. कधीं एकदां गीतेला जाऊन भेटतों असं त्याला होऊन गेलं. तो घाईघाईनं पावलं टाकूं लागला.



# नाकारलेली भेट

## १२

महालक्ष्मीच्या देवालयांत नौबत झडत होती. वाद्यांचे सुरेल स्वर आणि जोराचा घंटानाद यांचे संमिश्र निनाद जवळपास रहाणाऱ्या माणसांच्या कानांना चाटून जात होते. अंधाराचं प्रमाण हळुहळू वाढत होतं. बहुतेक घरांतून व रस्तोरस्तीं दिवे लागले होते.

देवालयाच्या मागील बाजूच्या उंचवट्यावर चंद्राचं बिऱ्हाड होतं. तिथंच बेतू आणि गीता केव्हांपासून बोलत बसली होतीं. चंद्रानं आग्रह केल्यामुळें आज संध्याकाळच्या वाफोरानं गांवीं जाण्याचा आपला बेत गीतेनं रद्द केला होता.

ज्या उद्देशानं आज ती पणजीला आली त्याच्या शक्यतेविषयीं गीता तिळमात्रही साशंक नव्हती. पण भावाचं अंतरंग पारखतांना त्या

पोरीला अनुभव काय आला? तो दगडही नाहीं आणि देवही नाहीं असं तिला वाटलं—

तिनं त्याला नानापरीनं विनविलं. दोन लहान मुलांनीं एकमेकाशीं वागावं तशी ती त्याच्याशीं वागली. "दादू, आपली आवय मनाची दुष्ट नाहीं रे! तिला तूं वाईट केलंस! तुझ्या कृतीनं तिला दुष्ट बनविलं! म्हणून ती तुझ्याशीं तशी तुसडेपणानं वागते! तुला शिव्या-शाप देते! नपेक्षां आक्काबद्दल, माझ्याबद्दल तिला किति प्रेम वाटतं पहा! जरा कुठं आमच्या कपाळाला मिरीं लागलं कीं तिचा जीव खालींवर होतो! वेड लागल्यासारखी तिची गत होते! तेंच प्रेम तुझ्यावर तिला करतां येत नाहीं, असं थोडंच आहे? पण तुझा स्वभाव तूं सोडीत नाहींस! जें नीतिला संमत नाहीं, ज्याला लौकिकतेचं पाठबळ नाहीं, जें कौतुकाला कधींच पात्र ठरत नाहीं, असंच प्रत्येक कृत्य करण्याकडे तुझ्या स्वभावाचा ओढा! तुझं नांव ऐकलं कीं गांवांतील कित्येक लोकांना तीन तांबे आंगावर ओतावेत असं वाटतं! तुझं नांव घेतांना आपली जिव्हा विटाळण्याचा अविर्भाव ते चेहऱ्यावर खेळवितात! हें असं का बरं होतं? योग्यवेळीं तूं आपलं वर्तन सुधारलं असतंस तर तुझ्या प्रत्येक कृत्याबद्दल लोकांनीं रोज नाकं कां मुरडलीं असतीं? पण त्या बाजूनं तूं प्रयत्नच कधीं केला नाहींस! जीवन म्हणजे तुला आडदांडपणाचा खेळ वाटला! त्या खेळांत रात्रंदिन रमण्यांत तुला गंमत वाटूं लागली! तूं तो खेळ पूर्णपणें आत्मसात केलास! या खेळांत जखमी झालेला मनुष्य सहसा वर मान करीत नाहीं हें तुला कळलं नाहीं! तूं हंसतच राहिला! पण तें जगाला फसविणारं हास्य होतं! मनांतून तूं रडतच होता—"

"—खरं आहे! आणि म्हणूनच उशिरां का होईना पण मी सुधारण्याचा प्रयत्न केला—"

"कुणी? तूं?—"

"होय बरं गीता—"

"—आणि तें कधीं?—"

"नाहींतरी बरेच महिने झाले! दारू, जुगार, वगैरे दरेक व्यसनाचा तसंच प्रत्येक दुर्वतनाचा मी मनापासून त्याग केला. जगांत सन्मार्गानें वागायचं ठरविलं. लगेच मी मोटारीवर क्लीनरची नोकरी धरली. ड्रायव्हर होण्याच्या महत्वाकांक्षेनं मी त्या व्यवसायांत पडलों—"

"दादू, खरं सांगतोस तूं हें? माझी शपथ घे!"

बेतूनं शपथ घेतली. गीतेच्या चेहऱ्यावर हास्य झळकलं. ती कौतुकाच्या स्वरांत म्हणाली—"दादू हें ऐकून आवयला कितीतरी आनंद झाला असता! पण तो आनंद तिला लाभूं नये अशा एका नवीन भानगडींत तूं सध्यां गुंतला आहेस असं नुकतंच आमच्या कानावर आलं आहे. आणि तेवढ्यासाठींच तर मी तुला भेटायला आलें आज. तूं म्हणे एका क्रिस्तांव मुलीशीं लग्न करणार आहे! खरं हें?—"

"एकूण तुमच्या कानापर्यंत ही गोष्ट गेली तर? सकाळीं तूं मला हॉटेलजवळ भेटलीस तेव्हां हाच संशय मला आला होता. गीता ही गोष्ट खोटी नाहीं—"

"कोण मुलगी ही?"

" मागं मला साप चावला होता तेव्हां ज्या बापलेकीनं मला मृत्युच्या दाढेंतून बाहेर ओढून काढलं त्या पोंबुर्पेच्या सांतानची मुलगी–"

" या पोरींत तुला असे कोणते बरं गुण आढळले कीं तेवढ्याकरितां तुझा हिंदुधर्म, तुझी जात तुला कमी मोलाची वाटावी—"

" गीता, सर्व गोष्टीचा मनाशीं पूर्ण खल करूनच या गोष्टीला मी उद्युक्त झालों आहे! मला या गोष्टीपासून परावृत करण्याचा यत्किंचितही प्रयत्न करूं नकोस. तुला त्यांत यश येणार नाहीं! धर्म, जात यांचा त्याग एका विशिष्ट परिस्थितीपायीं मला केलाच पाहिजे! तें माझं कर्तव्य होऊन बसलं आहे—"

" दादू, दरेक दुवर्तनाचा आपण त्याग केला आहे अशी तर तूं क्षणापूर्वीच फुशारकी मारीत होतास! आणि आतां पहावं तर एका नवीन दुवर्तनाची पूजा बांधण्याची तूं प्रौढी मिरवतो, याचा अर्थ काय?"

" गीता, हा तुझ्या दृष्टीचा दोष आहे! सदसद्विवेक बुद्धीचा अनुकुल कौल घेऊनच हें कृत्य करायला मी प्रवृत्त झालों आहे! एकाद्या बऱ्या गोष्टीसाठीं वाईट गोष्ट करणं हें दुवर्तन ठरत असेल तर त्याला माझा नाईलाज आहे—"

यावर त्यांनीं आणखीही बराच खल केला. त्यांच्या बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे तात्त्विक प्रश्न त्यांनीं निर्माण केले. त्यांना उत्तरं दिलं. पण त्या डावांत बेतूचीच सरशी झाली. बिचारी गीता...

चंद्राच्या आग्रहावरून बेतूही त्या रात्रीं तिच्याकडे जेवावयास राहिला. सकाळीं अंथरूणावरून उठतांच गीतेला सकाळच्याच वाफोरानं एकोशीला जावयास सांगून त्यानं तिला आपण कामावर जात असल्याचं सांगितलं.

त्याचवेळीं त्यानं काल तिच्यासाठीं आणलेलं लुगडं तिच्या स्वाधीन केलं. तेव्हां ती संतापल्यासारखं करून म्हणाली—" मला नाहीं स्विकारतां येणार हें ! "

" कां ? "

" तें मी घेतलं तर आवय मला फाडून खाईल ! कारण ज्या इच्छेनं मी तुला भेटायला आलें तिचा तूं अव्हेर केल्याचं कळतांच तिच्या तळपायाची आग मस्तकाला जाईल ! आणि तशांत मी हें लुगडं तिच्यापुढं केलं तर ' त्या पातक्याची ही भेट तूं मुळीं स्विकारलीच कशाला ? ' असं म्हणून माझीही कानउघाडणी करण्यास ती कमी करणार नाहीं ! कदाचित, तूं मला हंसवून घरीं पाठविलं असतंस तर निदान तुझी ही भेट स्विकारण्यांत मला आनंद वाटला असता. आवयही त्याबद्दल कांहीं म्हणाली नसती—"

बेतूनं क्षणभर विचार केला. त्यालाही स्वाभिमान होताच. लुगडं त्याच्या पायाशींच पडलं होतं. तें कागदांत गुंडाळून घेऊन त्यानं डाव्या खांकेत धरलं. नाकारलेली ती भेट घेऊन तो मार्गस्थ झाला. रस्त्यांत कुणीतरी त्याला हटकलं. नवऱ्याला सोडून आलेली व पणजीला येऊन देहविक्रय करणारी ती एक सामान्य वेश्या होती. बेतू तिला चांगलाच ओळखीत होता. जवळजवळ ५–१० मिनिटं तीं एकमेकांशीं बोलत होतीं. मध्येंच बेतूनं तिला विचारलं–" एक लुगडं विकत घेतेस का ? गांवीं पाठविण्यासाठीं म्हणून घेतलं होतं. पण तें विकून टाकावं असं वाटूं लागलं आहे. हें पहा. सव्वा दोन रुपये किंमत आहे–"

बेतूनं हातीं दिलेलं लुगडं तिनें नीट पाहिलं. त्याचा रंग, रुंदी, लांबी वगैरे निरीक्षण केलं. आणि ती म्हणाली–" लुगडं पसंत आहे! पण माझ्याकडे तूर्त पैसे नाहींत बुवा! चार दिवस थांबत असशील पैशाला तर बघ! हो, येत्या रविवारीं नक्कीच देईन मी तुझे पैसे–"

बेतूनं तें कबूल केलं. कारण परत नेलं म्हणून व्यापारी कांहीं तें घेऊन पैसे परत देणार नाहीं याची त्याला जाणीव होती. त्या स्त्रीवर त्याचा विश्वास होता—





१०

# उपकाराची फेड

## १३

जगाच्या दृष्टीनं बेतूच्या स्वार्थत्यागाला काडीचीहि किंमत नव्हती. कारण त्याचा तो स्वार्थत्याग नीतीवर आधारलेला नव्हता. पण त्याला त्या गोष्टीची मुळींच कदर नव्हती. कामिनच्या बाबतींत त्यानं बुद्धीपेक्षां भावनेचाच कस अधिक लावल्यामुळें तिच्याहून जग त्याला खासच मोठ नव्हतं. उलट तें त्याला कितीतरी हिणकस वाटलं. साहजिकच होतं. कारण चांगल्या गोष्टीपायींहि पुष्कळदां नाईलाजानं माणसाला अनीतीच्या मार्गानं जावं लागतं हें स्वतः अज्ञ असूनही बेतुला कळत होतं. अनुभवानें तें त्याला माहीत झालं होतं. आणि तेंच अचूक ओळखायला डोळे असूनही जग आंधळ्याचं सोंग घेत होतं. ढोंगीपणाचा बुरखा पांघरून नीतीच्या गप्पा मारीत होतं. बेतूविषयीं कुणि काय बोलायचं बाकी ठेवलं ? तो एका ख्रिश्चनच्या मुलीशीं विवाह

करणार हें कळतांच त्याला ओळखणाऱ्याच्या जिभा सैरावैरा नाचूं लागल्या. त्यांना लगाम घालणं अशक्य होतं.

कुणि म्हणाले, त्याला नीतीची चाड कशी असावी? त्यानं काय करायचं बाकी ठेवलं आहे? त्याचा सामाजिक दर्जा तो काय? म्हणून त्याला समाजाविरुद्ध वर्तन करायची लाज वाटावी? कुत्र्याची वाकडी शेपटी नळींत घातली म्हणून का कधीं सरळ होणार आहे? एक ना दोन! लोक तोंडाला येईल तें बोलून जात.

ज्याची अब्रू दिवसाचे चोविस तास दारूच्या प्यालांत ओलावत होती, ज्याच्या कित्येक रात्रीं बाहेरख्यालीपायीं खर्ची होत, पोटाची खळगी भरण्यासाठीं लोकांना वेळोवेळीं लुबाडून जो स्वतःची पोटाची तुंबडी भरीतच होता, गळ्याशीं प्राण आलेल्या माणसाप्रमाणें ज्याची नीति कशीबशी जगत होती, अशा व्यसनी, कर्तृत्वहीन नि नादान लोकांनीं त्याच्या त्या भावी वर्तनाविषयीं उघडउघड नाकं मुरडून त्याचा शाब्दिक धिक्कार करण्याचंही औचित्य दाखविलं.

समुद्राच्या लाटांप्रमाणें एकामागून एक याप्रमाणें जेव्हां लोकांच्या तोंडून निघणाऱ्या या बातम्या बेतूच्या कानावर राजरोस येऊन आदळूं लागल्या तेव्हां कार्मिनबद्दलची स्वार्थत्यागाची अचाट भिंत कोसळून पडते कीं काय अशी त्याला क्षणिक शंका आली. त्याचं मन चलबिचल झालं.

पण छे! त्या लाटा बेतूच्या निश्चयाचा तीर ओलांडूं न शकल्यानें तीरावरच फुटून माघारी परतूं लागल्या—

कार्मिनच्या बापाला दिलेलं वचन आपण नेकीनं पाळायचंच या त्याच्या मनोरथाला वेगाची चालना मिळाली व होतां होईल तों त्या

वचनाची लवकर पूर्ति करण्याच्या आत्मीयतेला त्यानं न सुटणारा विळखा घातला. समाजाची, नीतीची तटबंदी त्यापुढें पुरती फोल ठरली—

कार्मिनवर दया करणं या त्यागाच्या कल्पनेंत बेतूचा स्वार्थही दडलेला होता, नाहीं असं नव्हें. कारण उघड होतं. बेतू कितीही सदाचारी असता तरी त्याच्या जातींत कार्मिन इतकी देखणी मुलगी त्याला कदापिहि लाभली नसती. हा एवढा स्वार्थ वगळल्यास त्याचा त्याग त्या मानानें कितीतरी मोठा होता.

नांवापुरता संबंध सोडल्यास त्याला जगांत आतां मायेचं माणूस तरी कोण होतं ? आई, बहिणी व इतर नात्याच्या माणसांपैकीं बहुतेकां-नींच त्याला यापूर्वींच दूर लोटलं होतं. त्याच्या चांगल्या गुणांचे तेवढे आपण भागिदार, दुर्गुणांचे नव्हेत हें त्यांनीं स्वकृत्यानं पटवून दिलं होतं.

जगांत कुणी कुणाचं नाहीं अशा समजूतीनं बेतूही त्यावेळेपासून आपलं कृतकर्म उरकीत आला होता. त्यानंही पण आपल्या त्या नात्याच्या माणसांकडे अनादरपूर्वक पाठ फिरविली होती—

व्यावहारीकदृष्टया जगांत तो सर्वस्वी एकटा होता.

उन्हांत फिरून जर्जर झालेल्या वाटसरूला एकाद्या झाडाखालील सांवलींत जाऊन बसण्याचा मोह होणं हें मनुष्यस्वभावाला मुळींच सोडून नाहीं. बेतूचीहि तीच गत झाली. मायेच्या माळेंतील सगळेच मणी सांडतांच तशाच प्रकारची पण किंचित निराळ्या मण्यांची नवीन माळ पैदा करण्यांत त्याला साहजिकच आल्हाद वाटला. सुदैवानं कार्मिनच्या रूपांत ती त्याच्या हाताशीं आलीहि. ती त्यानं उचलून घेण्याचाच अवकाश होता—

आजवर क्लीनर म्हणून त्यानं मोटारीवर काम केलं. पोटासाठीं त्याला ती नोकरी पत्करावी लागली होती. पण ती स्विकारतांना आपण ड्रायव्हर होण्याचे मनोरे मनाशीं चितारायला तो चुकला नव्हता. ती त्याची तपश्चर्या आज सफल झाली होती. आपण ड्रायव्हर व्हावं असं त्याला वाटूं लागलं होतं. त्यासाठीं दोन दिवसापूर्वीं आपली क्लीनरची नोकरी-सुद्धां त्यानं सोडली. तो ड्रायव्हर होण्याच्या खटपटीला लागला.

तिसऱ्याच दिवशीं त्याचें तें जागेपणींचें स्वप्न खरं ठरलं. 'लायसन' घेऊन तो ड्रायव्हर झाला. त्याच्या आयुष्याला स्थिरता आली.

एके दिवशीं त्यानं पाद्र्याकडून बाप्तिस्मा घेतला.

आणि नंतर कार्मिनशीं काजार लावून तो मोकळा झाला—

प्रसंगांतून पार पडण्यासाठींच कार्मिननं. त्या काजाराला आपली संमति दिली होती. सांताननेही बेतूला जांवई म्हणून पत्करला तोही याच कारणाकरितां. एरव्हीं हिंदु नवरा आणि क्रिस्तांव नवरी ही गुंफण तरी कशी जुळून आली असती?

धर्माबरोबर बेतूचं नांवही आतां बदललं होतं. बाप्तिस्मा घेतांना त्याला मिळालेलं जुवांव हें नांव त्याला कायमचंच चिकटून बसलं.

हळुहळू त्या मिश्र जोडप्याच्या संसाराला सुरवातही झाली.

पण अद्यापि जुवांववर विरोधी लोकांकडून होणारी टीका मात्र बंद झाली नव्हती. 'बाटगा!' या उपहासपूर्ण शब्दानं लोक त्याच्या नजरेआड त्याचा हल्लीं उद्धार करूं लागले होते.

त्याला त्यानं दाद दिली नाहीं.

कारण कार्मिनकरितां अपमानाचं केवढंही मोठं ओझं त्यानं मानेवर घ्यायचं ठरविलं होतं. त्याखालीं आपण कधीं वांकूं याची शंकासुद्धां त्याच्या भावनावश मनाला शिवली नाहीं.

कार्मिनशीं लग्न केल्यापासून कधीं वांकड्या नजरेनं त्यानं एकाद्या परस्त्रीकडे पाहिलं नाहीं. दारू, जुगार वगैरे व्यसनाचा तर त्यानं त्यापूर्वींच त्याग केला होता. बहुतेक सगळ्याच दुर्गुणांना त्यानं दूर लोटलं होतं. एकेकाळीं अनीतीचं जीवन जगणारा हा माणूस आज नीतीचा उपासक म्हणून मिरवतांना दिसत होता. फक्त कार्मिनशीं काजार करण्यापायीं त्यानं केलेला धर्मत्याग हेंच त्याच्या आजच्या स्वच्छ जीवनाला लागलेलं ठळक ' गालबोट ' होतं.

आणि कार्मिन ?—

ती सुखी होती का ? जुवांवचं सान्निध्य तिला खरंच का प्रिय होतं ? कीं तेलाचा रंग पाण्यांत नेऊन वितळण्याचा प्रयत्न करावा तशी तिची स्थिति होती ?

कोण याचं उत्तर देणार ?—

काळ ?—

होय, काळच ! ! !

---

# प्रसूतीकाळ

## १४

वारा गात होता. झाडंझुडपं नृत्य करीत होतीं. आकाश काळवंडून आलं होतं. शेजारचा दर्या गाजत होता. जराशानं विजा चमकूं लागल्या. ढगांवर ढग आपटूं लागले. जवळ छत्री नसलेले रस्त्यांतील वाटसरू पाऊस येणार या संभवानं घरच्या दिशेनं भिरींभिरीं पावलं टाकूं लागले. मुलं 'येरे येरे पावसा तुकां दितां पैसो' म्हणून नाचूं लागलीं. त्यांना खूष करण्यासाठीं कीं काय नकळे पावसाच्या धारीं पडून वाऱ्याबरोबर स्वैरपणें खिदळणाऱ्या रस्त्यावरील लाल मातीचा अकस्मात अवसानघात झाला. हळुहळू पावसाचे थेंब मोठमोठे होऊं लागले. माडांचीं चुडतं व त्यांवर सुकलेले नारळ खालीं पडूं लागले. शेजारच्या घरांतील माणसं तीं चुडतं व नारळ आणण्यासाठीं भर पावसांतच घराबाहेर जाऊन येऊं लागलीं. रस्त्याच्या दोन्हीही बाजूंच्या खळ्यांतून शेंदूरी रंगाचे फिक्कट असे पाण्याचे लोट वाहूं लागले. दारा-

बाहेर जमा झालेल्या पाण्यांत क्वचित ठिकाणीं लहान मुलं कागदाच्या होड्या करून सोडतांना दिसूं लागलीं.

एका रस्त्याच्या कडेनं दोन माणसं चाललीं होतीं. त्या दोघांच्याही हातांत दोन छत्र्या होत्या. पैकीं एक स्त्री होती. दुसरा पुरुष होता. स्त्री होती ती सुईण होती. तिचं वय पन्नासाच्या वर असावं. रुग्णालयें व वैद्यकशास्त्र यांना पारखी असलेली ही क्रिस्तांव बाई 'वैजीण' म्हणून पणजींतील पुष्कळ रहिवाशांना परिचित होती.

तिच्याबरोबर चाललेला पुरुष हा सांतान होता.

तो घाईघाईनं चालला होता. वास्तविक त्याच्याइतक्या वेगानं चालणं वैजीणीला कठीण जात होतं. पण "घरीं बाळंतीण कष्टत आहे! थोडं लवकर चला–" या सांतनच्या आग्रहामुळें ती शक्य तों जलद चालण्याची शिकस्त करीत होती.

कांहीं वेळानं तीं दोघं जुवांवच्या घरीं येऊन पोंचली.

आंत बाळंतीण तळमळत होती. ओरडत होती. जवळच शेजारच्या दोन खिस्तांवांच्या बाया येऊन बसल्या होत्या. जुवांव तिला पुन्हां पुन्हां धीर धरण्यास सांगत होता. नवरा या नात्यानं तिचं सांत्वन करीत होता.

वैजीण आंत येतांच जुवांव बाहेर आला.

जवळ जवळ ५।६ तास बाळंतीण सारखी कष्टत होती.

वैजीण मनांत म्हणत होती,—'काय गौडबंगाल आहे कांहीं समजत नाहीं! या बाईला सातवा महिना चालू आहे असं तर हिचा नवरा सांगतो आहे! आणि गर्भ तर पुरे नऊ महिने भरल्यासारखा दिसतो!" याचवेळीं तिला आणखी एक संशय आला—"मूल पोटांत मेलेलं तर नाहीं ना?"

ती आणखी पांच दहा मिनिटं थांबली. शेवटीं तिचा उत्साह मावळला. तिनं जुवांवला बोलावून घेतलं, आणि लवकर जाऊन डॉक्टरला घेऊन ये म्हणून त्याला सल्ला दिला.

जुवांवनं ती कामगिरी तत्काळ सासऱ्यावर सोंपविली.

त्याच पावलीं सांतान घराबाहेर पडला. मध्यंतरी आणखी पंधरा मिनिटं गेलीं.

सांतान घोड्याच्या गाडींतून डॉक्टरला घेऊन आला.

वैजीणीचं मत खरं ठरलं.

मूल पोटांतच मेलेलं होतं.

बाळंतीण मरतां मरतां वांचली.

कारण, डॉक्टरच्या सल्ल्यावरून बाळंतीणीला हॉस्पिटलमध्यें नेल्यावर ऑपरेशन करून मुलाला बाहेर काढण्यांत आलं होतं.

पाऊस जोरजोरानें पडतच होता. कानठळ्या बसतील इतक्या मोठ्यानें आकाशांतील ढोल वाजत होता. मधून मधून विजा चमकत असल्यामुळें माध्यान्ह काळच्या त्या अंधाराला विकट हास्य करण्याची वरचेवर लहर येत होती. शहराच्या बाहेर चुडतांच्या मल्लांनी बांधलेल्या झोंपड्या किंवा त्यांची छपरें वाऱ्यानं उडून जात होतीं. म्युनिसिपालटीनें रस्त्याच्या शोभेसाठीं दुतर्फा लावलेली झाडें कित्येक ठिकाणीं कोलमडून पडलीं होतीं. शहरांत सर्वत्र पाणीच पाणी झालं होतं. रस्त्यांत गस्त घालणारे सोल्दाद जवळच्या घरांचा आश्रय घेऊन राहिले होते. त्यांच्या-पैकीं जे पेडणें महालांतील होते ते पाऊस मुळींच ओसरत नाहीं असं पाहून उद्वेगानं म्हणून जात—" शिरां पडूं या पावसाचां ! ! "

---

## संसाराचा पट

### १५

जुवांवच्या काजारांतील बिंग कार्मिनला सातव्या महिन्यांत मूल झालं तेव्हांच कित्येकांनीं ओळखलं. लोकांना अंदरकी बात अवगत नव्हती. आणि ते स्वतःला माहित आहे असं जे समजत होते तें सर्वस्वी चुकीचं होतं. लोकांना वाटे कीं, जुवांवचा नि कर्मिनचा लग्नापूर्व शरीरसंबंध जुळून आला असला पाहिजे आणि यांच्यातूनच ती गर्भवती राहिल्यामुळं बेतूला जुवांव बनून तिच्याशीं काजार करणं क्रमप्राप्त झालं असलं पाहिजे ! एरव्ही ही काजाराची विषम घटना तरी कां घडून येती ?

—पण या साऱ्या कल्पनाच होत्या—

असं आहे म्हणून जुवांव तरी खरा प्रकार उघडकीस आणूं शकला असतां का? मुळींच नाहीं. उलट, त्यावर आपणाला जितका प्रदीर्घकाळ पडदा टाकतां येईल तितका टाकावा, किंबहुना आयुष्याच्या अंतापर्यंत आपण तें रहस्य गुप्त ठेवावं असं त्याचं प्रामाणिक मत होतं. एका दृष्टीनं लोकांचा त्याच्याविषयीं झालेला तो गैरसमज त्याला थोडासा फायद्याचाही झाला. याचं कारण तेवढ्यामुळं खरी वस्तुस्थिति गुप्त रहाण्यास त्यास मदत झाली होती.

तरीहि कार्मीनसारखी सौंदर्याच्या दृष्टीनं असामान्य असलेली पोर घरकान म्हणून पटकविल्याबद्दल त्याचे मित्र त्याला भाग्यवानच समजत. त्यांना त्याच्या घरकुलांतील त्या दागिन्याचा हेवा वाटे. त्याचा तो नमुनेदार संसारपट पाहून त्यांचं मन प्रसन्न होई.

—पण—

—झांकली मुठ सव्वा लाखाची हेंच खरं—

—गरीब बिचारा जुवांव...!!

भावनावशतेच्या मादक विळक्यांतून निसटणं शक्य नसल्यानें कार्मिनच्या पापाचा अर्धा वांटा त्यानं स्वतःच्या शिरावर घेतला होता, पण त्या त्यागाचं त्याला फळ काय मिळालं?

कार्मिनच्या प्रसूतीकाळांतून निर्माण झालेलीं शोकपूर्ण वलयें आज पुसट पुसट दिसत असतांहि कार्मिनच्या वृत्तींत प्रतिबिंबींत होणारं औदासिन्य व त्याचा भावार्थ जुवांवच्या मंद बुद्धीला कांहीं केल्या उकलेना. त्यामुळं तोही दिवसेंदिवस खिन्न दिसूं लागला. त्याचं कामावर देखिल लक्ष लागेना.

सुदैवानं त्याला मिळालेली नौकरीही चांगल्यापैकींच होती. मानाची होती. कांपालावर रहाणाऱ्या एका युरोपियन फिरंग्याचा तो ड्रायव्हर होता. सदरहू फिरंगी हा पणजीच्या लिसेवाचा डॉयरेक्टर होता. गृहस्थ कुटुंबवत्सल असून सुस्वभावी होता. गोव्यांत बरींच वर्षे गेल्यामुळें जुवांवचा हा धनी साधारणपणें कोकणी समजूं शकत होता व मोडकी तुटकी बोलतही होता. त्यामुळें पुर्तूगीज भाषेशीं फारसा परिचय नसतांही जुवांव ती नोकरी सहजरित्या पटकावून बसला होता. दाट परिचयानं पोपटासारखा एकादा पक्षीही मानवी भाषा आत्मसात करूं शकतो. मग जुवांव तर बोलून चालून माणूस. त्याला आपल्या धन्याची भाषा त्या मुदतींत जरी पूर्णत्वानं आत्मसात करतां आली नाहीं तरी त्या कुटुंबांत त्याच्या आयुष्याचा थोडासा वेळ नियमितपणें खर्चीं पडत असल्यामुळें तोहि पुर्तूगीज भाषेवर आपला मोडका तुटका अधिकार गाजवूं शकत होता. आपली नौकरी संभाळूनही जुवांवला दिवसा जेवायखायला वगैरे मध्यंतरीं कितीतरी वेळ मोकळा मिळायचा. ही वेळ तो बहुतेक आपल्या घरींच घालवायचा.

पण ज्या उद्देशानं तो घरीं जायचा तो त्याचा उद्देश मात्र क्वचितच सफल होत असे.

ज्या ज्या वेळीं तो घरीं जाई त्या त्या वेळीं कार्मिन आपलं आतां हंसतमुखानं स्वागत करणार, आपण थोडे उशीरां आलों या सबबीवर आपणाशीं क्षणभर अबोला धरणार, दाराच्या आड पाऊल टाकण्याच अवकाश कीं, ती चटकन् पुढें होऊन आपले दोन्हींही हात आपल्या गळ्यांत घालणार आणि म्हणणार—" लबाड! घरीं एक

माणूस आपली जेवायची वाट पहात उपाशींपोटीं तिष्टत बसलेलं असणार याची कांहीं कल्पना तरी शिवते का तुझ्या मनाला कधीं ? बोलून चालून पुरुषाचं हृदय तुझं ? स्त्रियांचं अंतःकरण तुला कसं बरं कळणार ? आतां येशील, जराशानं येशील म्हणून केव्हांपासून तुझ्या आगमनाकडे डोळे लावून उभी आहे ! एका माणसासाठीं आज मी किती किती सुंदर जेवण बनविलं आहे ! रोज मला हिंदुच्या जेवण-पद्धतीचीं स्तुतिस्तोत्रं गाऊन दाखविण्यांत तुला मोठा हुरूप येतो नाहीं ? पण आजचं जेवण जेवून तुझी ती बढाई खात्रीनं फोल ठरणार ! पहा तर एकदांचं जेवून ! जुवांव किती गोड स्वभाव आहे तुझा ! खरंच तूं मला आवडतोस ! माझं तुझ्यावर किती प्रेम आहे ! मी श्रीमंत बापाची लेक असते कीं नाहीं, तर तुला नोकरीच काय पण मला सोडून घटकाभरही घरांतून पाऊल बाहेर काढायला दिलं नसतं ! तुझ्या-बरोबर वेळींअवेळीं प्रणयक्रीडा करण्यांत मी माझं सर्वस्व वेचलं असतं ! तुला गुदगुदल्या करून तुला हंसवितांना मींहि मोठमोठ्यानं हंसलें असतें ! तुझें डोकं तासनतास छातीशीं धरून बसलें असतें ! एखादं कांतार गाऊन तुझं मनोरंजन करण्याचा प्रयत्न केला असतां ! धोब्याकडून धुवून आलेला तुझा सूट मी स्वतःच्या हातांनी तुझ्या आंगांत चढविला असता ! डोक्यावर हॅट ठेवली असती ! हातांत काठी दिली असती सुरेख अशी ! पायांत बुट घातले असते ! डोळ्यांवर चष्मा लावला असता ! तोंडांत सिगारेट कोंबली असती ! आणि फोटो काढतांना जशी दोन माणसं एकत्र उभीं रहातात तद्वत तुझ्या आंगाला आंग भिडवून आरशांत पाहिलं असतं मी तुझ्यासह

घटकाभर ! तुला आवडणारीं फुलं आणून फुलदाणींत भरलीं असतीं ! हिंवाळ्यांत आंगावर गरम रग ओढून तुला घट्ट मिठी मारून झोंपलें असते ! मांजरीच्या पिलांप्रमाणें तुझ्या गालाला गाल घांसून तुला रंजविलं असतं ! पण छे ! आपण पडलों गरीब ! दांत नसलेल्यानीं चण्यांची हाव तरी कां धरावी नाहीं ? गरीबांकडे पोट असतं आणि रसिकताही असते ! पण तिचं कोडकौतुक करायला गरीबांना कुठं सवड असते ? गरीबांची सारी धडपड पोटापुरतीच मर्यादित असते ! रसिकतेचीं दैवतें पुजायला त्यांच्याकडे पैसा नसतो ! वेळ नसतो ! म्हणूनच तर माझ्यापासून तुला आणि तुझ्यापासून मला दिवसाचे कितीतरी तास दूरदूर रहावं लागतं ! माझा प्राण तो ! कधीं कधीं विसरायचं नाहीं बरं आपण एकमेकांना ! जुवांव, तूं नसतास तर कार्मिनला हें तोंड जगाला आज दाखविणं अशक्य झालं असतं ! तूं माझा उद्धार केलास ! त्यागाच्या असंख्य मोहरा आठवून त्याच्या मोबदल्यांत माझं पाप विकत घेतलंस ! देव तुला सदैव सुखी राखो ! अगबाई, तूं अजून जेवायचा आहेस हें मी विसरलेंच ! चल, मीं तुला जेवायला वाढते. भूक लागली असेल तुला—" वगैरे मनोराज्यें करण्यांत तो गर्क होई.

—पण घरांत येऊन प्रत्यक्ष पाऊल टाकतो तों त्याच्या या सुखान्त कल्पना सपशेल मातीमोल ठरल्याचा कटु अनुभव येऊन त्याचं मन विदीर्ण व्हायचं—

कार्मिन खिन्न वदनानं एखाद्या खिडकींत उभी असायची अगर घरांतील मांजरीला पोटावर घेऊन त्याला गोंजारण्यांत, आपले फाटलेले

कपडे शिवण्यांत किंवा तशाच रीतीचं दुसरं एकादं काम करण्यांत गढलेली असायची. जुवांव घरीं आला काय आणि न आला काय तिला सारखाच! ती त्याच्याकडे पाहून आपण होऊन हंसली असं सहसा कधीं व्हायचं नाहीं! तूं नोकरीवरून कधीं आलास, मी तुला जेवायला वाढूं कां, तूं नेसलेली पाटलोण फाटली आहे तिला एकादं ठिगळ मारून देऊं का, तुझी प्रकृति अलिकडे किती खालावली आहे, तुला बरं वाटत नाहीं का, वगैरे अनेक प्रश्न जुवांवची घरधनीण या नात्यानं त्याला विचारणं त्या पोरीचं कर्तव्य होतं, पण जुवांव तितका भाग्यवान कुठं होता?

घरांत कार्मिननं रांधून ठेवलेलं अन्न केव्हां केव्हां त्यास स्वतःलाच बशींत घेऊन जेवावं लागे. स्वतःचे कपडेसुद्धां जरूरप्रसंगीं त्यालाच धुवून वाळत घालावे लागत. घरांत कचरा दिसला तर तोही त्यालाच झाडून काढावा लागे. त्यानं एक पोपट पाळलेला होता. त्याला ज्या पिंजऱ्यांत ठेवलं होतं त्या पिंजऱ्यांतील साफसफाई, पोपटाला द्यायचे खाद्यपदार्थ, वगैरे क्षुल्लक कामंसुद्धां त्यानंच केलीं पाहिजे होतीं. त्याला त्याखेरीज गत्यंतर नव्हतं. वास्तविक तो त्या घराचा मालक होता. पण ज्या ज्या वेळीं तो घरांत प्रवेश करी, त्या त्या वेळीं एकाद्या चोरासारखा मान खालीं घातलेला तो दिसायचा. त्यानं विचारलेल्या एकाद्या प्रश्ना-पलिकडे कार्मिन त्याला क्वचितच उत्तर देण्याचा प्रयत्न करी. कामा-शिवाय ती त्याच्याशीं कधीं बोलायची नाहीं. तिला केव्हांही पहा, ती आपली कसल्यातरी विचारांत गढलेली दिसायची. जन्मठेपेची शिक्षा वाट्यास आलेला एकादा तुरुंगांतील कैदीही तिच्याहून अधिक समाधानी

रहाण्याचा प्रयत्न करीत असेल, असं सहज तिच्या दुर्मुखलेल्या चेहऱ्याकडे नजर टाकतां वाटायचं—

ती अशी दुःखी दिसत होती त्याला एकच कारण होतं. तें म्हणजे आल्बेंतवरील तिचं गाढ प्रेम ! त्याच्यावरील तिची कामुक भक्ति ! त्याच्याकरितां ती नुसती वेडी झाली होती ! तो तर केव्हांच पणजीहून बदली होऊन केंप्याला गेला होता. त्याचं दर्शनदेखिल तिला आज दुर्मिळ झालं होतं. तरीहि ती मनानं त्याला विसरूं शकत नव्हती. विसरण्याचा प्रयत्न करूनही त्यांत तिला यश येत नव्हतं. जुवांव घरांतून बाहेर गेला रे गेला कीं ही पागल पोर तिच्या पेटींत असलेला आल्बेंतचा एक फोटो काढून त्याच्याशीं एकांतात रंगढंग करीत अगर त्याला आपलं हृद्गत सुनवित बसायची. वेडी समजूत ! पण तेवढंच तिला समाधान वाटे. आल्बेंतपासून तिनं तो फोटो आपणहून मागून घेतला होता. त्याला हृदयाशीं धरून बसण्यांत तिला एकप्रकारें दिव्यानंद व्हायचा. पण तिचा हा घातूक लपंडाव जुवांवच्या कधींकाळीं नजरेस पडता तर न जाणों त्या वेडगळानें असूयेच्या धुंदींत तिचा तत्प्रसंगीं गळा दाबून प्राण घ्यायलाही कमी केलं नसतं—

हीं घरकुलांतील दुःखें लोकांना ओरडून सांगण्यासारखीं नव्हतीं. ते टाकीचे घाव सहन करतांकरतांच एक दिवस आपण वेडे होऊं असं जुवांवच्या बापड्या बुद्धिमत्तेला हल्लींशा वाटूं लागलं होतं. संसाराचा रंगतदार पट मांडून तो बसला होता पण त्यांतील अपयश कबूल करण्याचं धाडस त्याच्यांत नव्हतं. स्वतःचं चारित्र्य सुधारण्याचा प्रयत्न करीत असतांना अधःपाताची एक नवीन दरी त्याच्यासमोर 'आ'

वासून उभी होती. या दरींत आपला बळी तर पडणार नाहीं ना, या भीषण शंकेनं तो अलिकडे थोडी 'ध्यायला'सुद्धां लागला होता. टाकलेल्या त्या अनिर्बंध व्यसनावर लाचार बनून त्यानं पुन्हां झेंप टाकली होती.

आजही तिन्हीसांजच्या वेळीं तो घरीं आला तो 'तर्र' झालेल्या स्थितींतच.

येतांच आंगांतील कोट व डोक्यावरची टोपी त्यानं एका कोपऱ्यांत भिरकावून दिली. तो बाहेरच्या सोप्यावर येऊन लवंडला. त्याच्या मनांतून आज कार्मिनशीं भांडण उरकून काढायचं होतं. त्यासंबंधीच त्याचे आतां विचार चालले होते. भांडणाची सुरवात कोणत्या रीतीनं करावी कीं ज्यामुळें आपले बेत तडीस जाण्यास आपणास मदत होईल याचा तो अंदाज घेऊं लागला. आणि क्षणांत त्याची कल्पना त्यासंबंधी निश्चित झाली. तो रागानें लालबुंद होऊन एकाएकीं सोप्यावरून आंत गेला. घरांत कार्मिनखेरीज त्यावेळीं दुसरं कुणी नव्हतं. तो उगीच कांहींतरी हुडकीत असल्याची बतावणी करूं लागला. पण जें मुळांतच नव्हतं तें त्याला शोधून कसं मिळणार? चटकन् तो भिंतीवर तेवत असलेल्या दिव्यापाशीं गेला. कारण नसतांना त्यानं सूडबुद्धीनं त्या दिव्याची ज्योत मोठी केली. क्षणांत दिव्यावरील चिमणीवर काजळी मांडून दुसऱ्याचक्षणीं ज्योत भडकल्यानं ती कडाडून फुटली आणि तिच्या कांचा जमिनीवर पडल्या. "हें काय? काय चालवलं आहेस तूं हें?" असं म्हणून जवळच बसलेली कार्मिन एकदम उठून किंचित पुढें आली. तिच्या त्या शब्दांतून संताप व्यक्त झाला होता. जुवांवचं तें कृत्य तिला सहन झालं नव्हतं. पण जुवांव तिला कसली दाद देतोय! तोही तिच्या तोंडून

फुटणाऱ्या शब्दाचीच वाट पहात होता. कार्मिनच्या तत्कालीन विचार-ळेल्या घाबरट प्रश्नांना त्यानं खरमरीत उत्तर दिलं. तो म्हणाला, "मला हवं तें करतोय ! !"

त्या बेमुर्वत उत्तरानं कार्मिन जराशी नरमली खरी पण तिच्यानें स्वस्थ कांहीं बसवेना. जुवांव दारू पिऊन आलेला आहे हें तिनं कधींच ओळखलं होतं. त्याला प्रत्युत्तर करणं तिच्या जिवावर आलं. तरीहि ती म्हणालीच—"पण तुझ्या या उपद्व्यापामुळें घराला आग लागणार त्याची वाट काय ?"

"उपद्व्याप !" या तिच्याच शब्दावर जोर देत जुवांवनं आपला चेहरा वेडावांकडा केला व डोळ्याचं पातं लवतं न लवतं तोंच तो कार्मिनच्या आंगावर धांवला. तिच्या उजव्या गालावर त्यानं जोराची थप्पड लगावली.

कार्मिननं एक जोराची किंचाळी फोडली.

"बेशरम !" जुवांव स्वर चढवून म्हणाला, "मला शहाणपणा शिकवतेस होय ! मूर्खपणाची धनीण तूं ! आणि त्याचं प्रायश्चित मला ! मी जातींतून उठलों ! धर्माला बगल दिली ! कां ? तुझ्यासाठीं ! तुझ्या पापावर पडदा टाकण्यासाठीं ! पण त्याचा मोबदला मला काय मिळाला ? संसारांत राहून तूं स्मशानगीत गायला लागलीस ! तें ऐकून मी स्वस्थ बसावं असं का तुला वाटतं ? मी दमून भागून घरीं येतों तों तुला दु:खी पहाण्यासाठीं नाहीं ! शहरांत खाणावळी काय कमी आहेत, म्हणून मी घरीं येऊन जेवावं ? मी तुझा असा कोणता गुन्हा केला होता म्हणून माझ्या सहनशील मनावर तूं वेळोवेळीं आपल्या वागणूकीनं

डागण्या द्याव्या? पश्चातापानं अर्धमेला बनून माझं पूर्वचारित्र्य सुधारण्याचा मी विडा उचलला होता! जगानं कितीही तुच्छतेनं आपणाकडे पाहिलं तरी आपण आपलं पुढील आयुष्य सन्मार्गानें घालवायचं असं ठरवून मीं त्या बाजूनें परिस्थितीला अनुकूल करून घेण्याच्या उद्योगालाही लागलों! त्या माझ्या प्रयत्नाला पहिला सुरूंग लावण्याचं काम तुझ्या माझ्या लग्नानं केलं! आणि या लग्नानंच मला पुन्हां दगा दिला! तुझ्याशी लग्न करण्यापूर्वी मी दूर लोटलेल्य व्यसनांना आज पुन्हा जवळ करण्याची सक्ति माझ्यावर होत आहे! घर म्हणजे मला बंदीशाळा वाटते आहे! संसारीं मनुष्य घरांत पाऊल टाकतो तो श्रमलेल्या जिवाला विसांवा मिळण्याकरितां! पण माझा अनुभव काय सांगतो? मी सांवलींत म्हणून पाऊल टाकावं आणि ती सांवली नसून प्रखर ऊन असल्याचा प्रत्यय येऊन पायाला चटका बसावा तशी माझी आजची संसारांतील गत आहे! तुला काय वाटलं, मी मूर्ख आहे, दारू प्यालों आहे म्हणून दिव्याची ज्योत मोठी केली म्हणून? छे! इतके दिवस हृदयांत जळणारी त्वेषाची ज्योत आज ह्या दिव्याच्या रूपानें भडकली इतकंच! याउप्पर नीट लक्षांत ठेव! कान देऊन ऐक मी काय म्हणतों तें! लग्नाची बायको या नात्यानं तूं यापुढें माझ्याशीं वागली पाहिंजे! साखर खायची तर ती मुंगीच्या रूपानं खाल्ली पाहिजेस! तसं न करितां, एखाद्या मस्तावलेल्या म्हैशीप्रमाणें मला पहातांच शिंगें उगारूं लागलीस तर सर्व शक्ति एकवटून तीं शिंगं मुळासकट मोडून काढण्यांत मी कदापिही मागंपुढं पहाणार नाहीं, हें तुला आज प्रथमतःच सुचवून ठेवतों! याद राख—"

—आणि खरंच ! जुवांव विलक्षण संतापलेला होता ! इतका कीं, जर का त्यावेळीं तो बोलत असतांना कार्मिननं त्याला मध्यें अडथळा करण्याला प्रयत्न केला असता तर कदाचित जखमी होऊन जमिनीवर पडलेल्या कबुतराला जवळ असलेल्या मांजरानं पिसडून खावं, तद्वत त्यानं त्या पोरीची गत केली असती ! ! इतका तो त्याप्रसंगीं क्रूर बनला होता—

—पण कार्मिन शहाणी अशासाठीं कीं, तिनं त्याला एका शब्दानंही उत्तर अगर प्रत्युत्तर केलं नाहीं—

ती रात्र कशीबशी निघून गेली.

जुवांव दुसरे दिवशीं सकाळीं अंथरुणावरून उठून पहातों, तों कार्मिन घरांत नाहीं ! ती कुठं गेली, कां गेली, वगैरेबाबत त्याला कांहींच कळलं नाहीं ! त्यानं सगळीकडे फिरून तिचा शोध केला ! पण पिंजऱ्यांतून सुटलेला पक्षी तो ! त्याच्या दृष्टींतून तो कधींच निसटला होता—

—गरीब बिचारा जुवांव ! ! आणि भावनावशतेनं संसारपट उधळून लावून कुठतरी भुर्कन् उडून गेलेली दुबळी कार्मिन—

---

# अंतरींचा कोलाहल

## १६

कांपलच्या रस्त्यावर ह्मणण्यासारखी लोकांची रहदारी नव्हती. आसपासच्या त्या नितांतसुंदर बंगल्यांतही त्यावेळीं भलतीच शांतता नांदत होती. ऊन पडलं होतं. रस्त्यावरील नंदनगोळीचीं झाडं वारा नसल्यामुळें हुं कीं चूं करतांना दिसत नव्हती. मधूनच तेथिल फिरंग्याकडे कामास असलेला एकादा क्रिस्तांव नोकर हातांत बाजाराची टोकरी घेऊन मार्केटकडे जातांना दिसत होता. तेथून सरळ गास्पार-तीयकडे जाणाऱ्या एका निरुंद रस्त्यांच्या दुतर्फा असलेल्या नारळींच्या बागांत 'पाडा' चालू होता. माडांवर चढलेले पाडेली 'कुई' घालीत होते. त्यांनीं टाकलेले नारळ व चुडतं गोळा करण्यासाठीं खालीं कांहीं नौकरमाणसं खपत होतीं. पणजी बंदराकडे पाठ करून

मुंबईकडे जाणारी दोन नळांची एक आगबोट मांडवी नदीच्या पात्रांतून धूर ओकीत नुकतीच समोरील भव्य अरबी समुद्रांत प्रवेश करीत होती. त्याचवेळीं आपल्या धन्याच्या बंगल्यासमोरील दरवाजांत मोटर उभी करून जवळच रस्त्यावर पहारा करणाऱ्या एका ओळखीच्या सोल्यादाकडे जुवांव बोलत उभा होता.

कांहीं वेळानं जुवांवचा मालक बंगल्यांतून बाहेर पडून मोटारींत येऊन बसला. त्यांना जुवांवनं 'लिसेव सेंत्राल' कडे नेऊन सोडलं आणि त्यानं पुन्हां गॅरेजकडे मोटर वळविली.

काम संपवून तो घरीं आला. दाराला कुलूप पाहून त्याला कार्मिनची आठवण झाली. दार उघडून तो आंत गेला. तोंच इतका वेळ सोप्यावर थप्पल मारून बसलेलं मांजर जुवांवच्या मागून आंत जाऊन त्याच्या पायाशीं लगट करूं लागलं. जुवांवनं प्रथम आंत जाऊन खिडकी खोलली. कपडे उतरून ठेवले. तरीहि पायाशीं लगट करणाऱ्या त्या मांजराला उचलून घेण्याची सुबुद्धी कांहीं त्याला झाली नाहीं.

येतांना तो बरीच 'झोंकून' आला होता.

आज तीन दिवस झाले. त्यानं पिण्याचं आपलं प्रमाण बरंच वाढविलं होतं.

पत्नि या नात्यानं कार्मिन त्याच्याशीं फारच क्वचित वागली होती. तिनं तें आपलं कर्तव्यकर्म मुळींच ओळखलं नव्हतं असं म्हटलं तरी चालेल. पण ती घर सोडून जातांच तिचा विरह जुवांवला भलताच जाणवला. त्याची तिच्यावर भक्ति होती, प्रेम होतं. पण त्याच्या त्या

भक्तीला, प्रेमाला कार्मिनच्या उत्तेजनाभावीं अंकूर फुटण्याचा योगच मुळीं आजवर आला नव्हता. एवढ्याचसाठीं ती भक्ति लोपली होती. तें प्रेम नासलं होतं.

तीन दिवसापूर्वी कार्मिन जी घर सोडून गेली ती जुवांच्या पॉकिटांतील ५।६ रुपयांवर डल्ला मारून. एरव्हीं तिनं विशेष असं बरोबर कांहींच नेलं नव्हतं. तिनं नेलेली ती रक्कम वाट खर्चासाठीं नेली असली पाहिजे याचा जुवांवला तत्क्षणींच बोध झाला. तो त्याबद्दल मुळींच रागावला नाहीं. पण कार्मिन निघून गेली याचंच त्याला वाईट वाटलं. ती रात्र त्याची अतिशय दुःखांत गेली. कार्मिनला आपण रागाच्या भरांत इतकं टाकून बोलायला नको होतं असं त्याला वाटलं बहुतेक ती आल्बेतचा शोध काढीत केंप्याला गेली असली पाहिजे हा संशय जुवांवच्या मनांत तत्क्षणींच दृढ झाला. पण तिथं जाऊन तिचा तलास लावायला त्याला वेळ कुठं होता? त्याच्यामागें नोकरीचं कडक बंधन होतं. त्यामुळें येत्या रविवारीं रजा काढून आपण केंप्याला जाऊन कार्मिनची चौकशी करायची हा बेत मात्र तो मनाशीं नक्कीच करून चुकला होता. साहजिकच तो त्या संधीची वाट पहात राहिला. पण त्याचं दैव किती चमत्कारीक पहा! निष्ठुर काळाला त्याची तेवढीही इच्छा पहावली नाहीं—

संध्याकाळची वेळ होती.

घर सोडून जुवांव कांपालावरील आपल्या मालकाच्या बंगल्याकडे चालला होता. तिथं जातांच त्यानं गॅरेजींतून मोटार काढून घेतली. मालकाला ऑफिसांतून आणण्यासाठीं म्हणून तो 'लिसेव सेंत्राल'कडे

चळला. त्याच्या मोटारचा वेग फारच जोरांत चालू होता. अकस्मात त्याच्या मोटारीखालीं एक भीषण असा अपघात घडला. तें विस्मयकारक दृश्य पाहून जुवांवनं एकच किंकाळी फोडली. त्याच्या डोळ्यासमोर अंधार पसरला. जवळजवळ वेड लागण्याची त्याच्यावर पाळी आली.

दोष त्याचाच होता.

सात आठ वर्षें वयाची ती एक मुसलमान मुलगी होती. एका बकरीला पकडण्यासाठीं ती पोर तिच्यामागून पळत सुटली होती. बकरी पुढें आणि मुलगी मागें अशी त्या दोघांची रस्त्यावर शर्यत लागली होती. जुवांवचं डोकं नीट ताळ्यावर असतं तर तो अपघात टाळणं कांहीं त्याला कठीण नव्हतं. पण समोर दृष्टि आणि मन कार्मिनच्या विवंचनेंत अशी त्याची स्थिति होती. त्याचं त्याला मिळालेलं तें प्रायश्चित्त होतं. बकरी मुलीच्या हाताशीं यायला आणि त्या उभयतांना अपघात घडायला एकच गांठ पडली. बकरी आणि मुलगी अगदीं जवळजवळ मरून पडलीं होतीं, रक्ताचे पाट वाहून रस्त्यावरील माती किंचित ओलसर झाली होती.

अपघात घडलेल्या जागेपासून एका अड्ड्यावर एका नारळीच्या बागेंत एक सार्वजनिक स्वरूपाची विहीर होती. तिथं कांहीं बाया पाणी न्यायच्या निमित्तानं आल्या होत्या. त्यापैकीं एकटी जवळच्या दगडावर धुणीं धूत होती. अपघात घडल्याची चाहुल लागतांच त्या सर्व बाया हातांतील काम सोडून मोटारीच्या दिशेनं पळत सुटल्या.

जुवांवच्या दृष्टींतून तें दृश्य अर्थातच निसटलं नाहीं. आपण आतां तिथं अधिक वेळ थांबणं त्याला धोक्याचं वाटलं. त्याची समयसूचकता

त्याला तिथं क्षणभरही थांबायला कबूली देईना. प्रसंग अतिशय आणिबाणीचा होता. गुन्हेगारांना दीर्घ मुदतीच्या करारानं कोंडून ठेवणारा 'आग्वाद'चा तुरूंग आणि 'मस्मी'चा काळा समुद्र त्याच्या दृष्टीसमोर उभा राहिला. केवळ कल्पनेचाच आभास! पण तेवढ्यानंच तो कितीतरी घाबरला! त्यानं चटकन् मोटारींत जाऊन बैठक मारली आणि इतक्या जोरानं मोटर हाकली कीं घटकेंत तो कुणालाच दिसेनासा झाला.

विहीरीकडून आलेल्या ३।४ बाया अपघात घडलेल्या त्या जागेपाशीं येऊन दाखल झाल्या. त्यापैकीं कुणालाच तें दृश्य पहावेना. त्यांच्या आंगावर कांटा उभा राहिला. एकटी तर तें दृश्य पाहून ढळढळां रडूं लागली. त्यांत एक पिकलेल्या केंसाची बाई होती. तिनं अपघातांत मरून पडलेल्या मुलीचा तोंडवळा नीट ओळखला. आणि बरोबरच्या बायांना ती सांगूं लागली—"ही पोर तर त्या हासनची मुलगी!" त्यावर दुसरीनं तिला प्रश्न केला—"कोण हा हासन?" पहिलनं उत्तर दिलं—"कामतीच्या भाटांत पेंटराच्या शेजारीं रहातो ना, तो—"

पण तेवढ्यानंही त्या दुसऱ्या बाईच्या डोक्यांत प्रकाश पडला नाहीं. म्हणून तिनं विचारलं—"तो लॅाट्री घेऊन फिरतो तो हासन म्हणतेस कीं काय तूं?"

"हो ग हो!" म्हातारी उत्तरली.

मध्येंच तिसरीनं तोंड घातलं. ती संतापयुक्त स्वरांत म्हणाली—"फार शेफारले आहेत हे मेले ड्रायव्हर लोक! जो तो उठतो तो ड्रायव्हर होतो! जणुं काय विमानासारखी चालवितात मोटर! समोरून

चाललेलीं माणसंदेखिल मेल्यांना दिसत नाहींत! पळाला पहा कसा चांडाळ! कुठं जाईल म्हणा! मी चांगली ओळखतें ती मोटर! ती कुणाची, तिचा मालक कुठं रहातो वगैरे सगळं कांहीं मला माहित आहे! नेहमीं येते या बाजूनं ही मोटर! आपण पळालों म्हणजे सुटलों असं वाटत असेल या ड्रायव्हरला! पण मी त्याला पुरा ओळखून आहे म्हणावं! झेलीच्या माक्नाकडे असतो ना तो बाटगा! मार्केटांत सांतान म्हणून कुणि एक क्रिस्तांव पुजात घालून बसलेला आहे! त्याच्या पोरीशीं काजार करण्यापायीं हा माणूस हिंदुचा क्रिस्तांव झाला आहे म्हणे! स्वतःचा दोष नसता तर मोटर घेऊन कां पळाला लबाड? भोग म्हणावं चांडाळा आपल्या कर्माची फळं आतां! बिचारी पोर बकरीला पकडण्यासाठीं धांवत होती वाटतं! शेवटीं काळानं दोघांचाही बळी घेतला! काय हा विचित्र प्रसंग! देवा, वैऱ्यावर देखील असला प्रसंग कधीं आणूं नकोस! गरीब बिचारा हासन! त्याला ही दुःखांत हकिगत ऐकून काय वाटेल बरं?..."

तोंच इतका वेळ तें दृश्य असह्य होऊन ढळढळां रडत सुटलेली ती चौथी बाई अपघाताला कारणीभूत ठरलेल्या ड्रायव्हरला मोठमोठ्यानं हेल काढून शिव्यांची लाखोली वाहूं लागली.

त्यावेळीं जुवांव कुठं होता?

रायबंदरचा पाटा ओलांडून त्याची मोटर कुठंतरी दूरदूर चालली होती. कुठं हें त्याचंच त्याला माहित नव्हतं. परिस्थिति त्याच्या आटो-क्याबाहेर गेली होती. एवढं आयुष्य आतां लपूनछपून कसं काढावं या

विवंचनेंत तो होता. तुरूंगाची त्याला भीति वाटत होती. कुठंतरी मोटर उभी करून इंग्रजींत पळून जाण्यांचा त्याचा विचार असावा.

कुंडईच्या घांटीवर आल्यावर त्याच्या मोटारीचं पेट्रोल एकाएकीं संपलं. त्याच्यापुढें एक मोठा पेंचप्रसंग उभा राहिला. जवळ कुठें पेट्रोल विकत घेण्याची सोय नव्हती. शिवाय त्याच्याकडे तेवढे पैसेही नव्हते. काय करावं याचा त्याला डोकं खाजवूनही बोध होईना. वेडगळासारखा तो क्षणभर विचार करीत राहिला. अंतरींचा तो कोलाहल जीवितांतील अर्थशून्यता त्याला क्षणोक्षणीं पटवून देत होता. निराशेच्या अंधारानं त्याचं अंतःकरण व्यापलं होतं. तरीही जगाचं प्रतिनिधीत्व झुगारून द्यायला त्याचा अंतरात्मा तयार होईना! खऱ्या नांवानं जरी नाहीं तरी खोट्या नांवानं यापुढं जगांत वावरण्याची त्याची आजची मनोकांक्षा त्याला मोह पाडून बसली नसती, तर तुरूंगाचा भयानकपणा चुकविण्या-साठीं तो इतक्या दूरवर तरी कां पळून आला असता? त्याच्या या पळण्याच्या कल्पनेंतच त्याला अजून जगायचं आहे हें सिद्ध होत होतं, नाहीं?

हळुहळू अंधाराचं प्रस्थ वाढूं लागलं. गर्द झाडीनं व्यापलेला शेजारचा डोंगर व रस्त्याला येऊन भिडलेला त्याचा कठडा जसजसा सृष्टीचा उजाळा कमी होऊं लागला तसतसा विषेश भयानक भासूं लागला. तेथून पांच मिनीटांच्या अंतरावर असलेल्या मंगेशीच्या देवळाचा घुमट व दीपस्तंभ नारळी–पोफळीच्या आणि आंब्या–फणसाच्या झाडांतून वर डोकावून पहातांना घांटीवरून अस्पष्ट असा दिसत होता. आणि बहुतेक तिथंच

नौबतीचा चौघडा झडत होता. त्याचे स्वर कुंडईच्या घांटीवर उभा असलेल्या जुवांवला ऐकूं येत होते.

त्याचवेळीं कुणि एक बाई व एक मुलगा कुंडईचा उतार चढून आपणाकडे तोंड करून येतांना जुवांवला दिसलीं. त्या बाईला पूर्वी आपण कधींतरी पाहिल्याचा जुवांवला तितक्यांत संशय आला. बुडत्याला काडीचा आधार म्हणतात तशांतली गत—



# कार्मिनचा तलास

## १७

ती रात्र जुवांवनं मंगेशीला घालविली. कुंडईच्या घांटीवर त्याला मिळालेली ती स्त्री त्याच्या परिचयाची निघाली नसती, तर त्या रात्रीं सुखानं दोन घटकाही झोंप घेणं त्याला अशक्य झालं असतं.

कशीबशी अब्रुनें जगणारी ती एक वेश्या होती. तिचं नांव होतं कामलता. तिचा पेशा कलावंतीणीचा असल्यानें आपला पिढीजात धंदा संभाळून ती मधून मधून नाचगाण्याचींही आमंत्रणं स्विकारी. ती ज्या मेळ्यांत होती तो मंगेशीचा मेळा सबंध गोव्यांत फार प्रसिद्ध होता. जेव्हां तुळशीचं लग्न झालं तेव्हां याच बाईला बेतू उर्फ जुवावनं नाचण्याचं आमंत्रण देऊन कांयसुवला नेलं होतं. हीच काय ती त्याची आणि कामलतेची ओळख.

कुंडईच्या घांटीवर जुवांवची मोटर येऊन जेव्हां बंद पडली तेव्हां कांहीं कामानिमित्त आपल्या ७।८ वर्षांच्या मुलासकट कुंडईला गेलेली कामलता आपलं काम संपवून पुन्हां पाय वाटेनं मंगेशीला जात होती. रस्त्यांत त्या दोघांना एकमेकाची ओळख पटली. आणि त्या निमित्तानं तीं कितीतरी वेळ त्या ठिकाणीं बोलत उभीं राहिलीं.

रस्त्याच्या कडेला असलेल्या डोंगरटेकडीच्या कठड्याला लागून जुवांव त्यावेळीं आपली मोटर उभी करून मोकळा झाला होता.

त्यानं कामलतेला मोटर नादुरुस्त झाल्याचं. सांगितलं पण हें त्याचं म्हणणं खरं नव्हतं. मोटर बंद पडली होती याचं कारण तींत पेट्रोल नव्हतं हें होय.

कामलतेनं विचारलं—"मग तुम्हीं इथं किती वेळ थांबणार? दिवे लागायची वेळ झाली! विचार तरी काय आहे तुमचा?"

तो डोकं खाजविल्यासारखं करून म्हणाला—"विचार कसला करायचा? नादुरुस्त झालेली मोटर अंधारांत दुरूस्त कशी करतां येणार?"

"मग आजची रात्र तुम्हांला इथंच कुठंतरी मुक्काम करावा लागेल, नाहीं? तसं असेल तर मग आमच्याकडेच चला ना! मी कांहीं तुम्हाला अगदींच परकी नाहीं! कोण कुणाकडे कारणाशिवाय येतोय म्हणा! सहजच रस्त्यांत आज किती वर्षांनीं तुमची गांठ पडली आणि तीहि तुम्हीं अडचणींत असतांना. मग चलतां माझ्या गरिबाच्या घरीं?"

जुवांवला तरी दुसरं काय हवं होतं? न मागतां पदरांत पडत असलेला तो आसऱ्याचा कौल दूर सारायला तो काय मूर्ख होता! त्या विनंतीला त्यानें लगेच होकार दिला.

पण मोटारीचं आतां काय करावं हा प्रश्न जुवांवला त्याप्रसंगीं साहजिकच भेडसावूं लागला.

पण तेवढ्यानं तो अडून बसला नाहीं.

जिथें आपलं आजचं जीवितच मुळीं धोक्यांत आहे, तिथं मोटारीची काळजी घेऊन आपणाला करायचंय काय असा त्यानं मनाशीं विचार केला. मोटर काय, उद्यां पोलिसांना तलास लागतांच ज्याची त्याला परत मिळून जाईल. आपणाला तरी ती घेऊन काय करायचंय? काय होईल तें होऊं द्या! आजची ही एवढी रात्र संपली कीं आपण तरी कुठं पुर्तुगीज हद्दींत रहातों! उद्यांच्या उद्यां हा देह आपणाला इंग्रजींत नेऊन टाकलाच पाहिजे असं ठरवून कामलता व तिचा मुलगा ह्यांच्याबरोबर तो मंगेशीला जायला निघाला.

पण त्यावेळीं आपण आज कोणत्या परिस्थितींत आहोंत यासंबंधीं त्यानं कामलतेला तिळमात्रही सुगावा लागूं दिला नाहीं.

त्यामुळें आपणाकडे आलेला पाहुणा हिंदुच आहे असं धरून चालणं हा कामलतेचा मुळींच दोष नव्हता. कारण, त्यानं धर्मांतर केल्याची अफवा तिच्या कानांवरच कधीं आली नव्हती. शिवाय तो आपल्या नेहमींच्या शोफरच्या युनिफॉर्ममध्यें होता. त्या वेषांत कोण हिंदु आणि कोण क्रिस्तांव हें अचूक ओळखणं भारी कठीण होतं. तशांत जुवांव कामलतेला हिंदु म्हणूनच माहित होता. साहजिकच त्या कल्पनेला साजेल अशा वर्तनानं ती त्याच्याशीं त्या रात्रीं वागली.

केळीचें पान मांडून तिनें त्या रात्रीं त्याला जेवायला वाढलें.

जेवण आटपून जुवांव बाहेर येतो तों पानाचा डबा काढून तिनं त्याच्यापुढें केला आणि त्याला पानाबरोबर देण्यासाठीं म्हणून अडकित्यानं बेडा सोलायला तिनं सुरवात केली. सोललेला बेडा तिनं लगेच फोडून त्याचे कांहीं तुकडे तिनं जुवांवच्या हातावर टाकले. जुवांवनं स्वतःच्या हातानें पान बनवून तें तोंडांत टाकलं.

तोंच गांवचा वासूभट कामलतेचा शोध करीत तितक्यांत तिच्या घरीं आला.

"कधीं आलांत मडगांवहून, वासूभट?" येतांच कामलतेनं त्यांना विचारलं.

"दोन तास सुद्धां झाले नाहींत येऊन."

"काय खबरबातमी आणलीत मडगांवहून? कसे आहेत जांवई तुमचे? शालन् बरी आहे ना?"

"बरीं आहेत सगळीं! पुष्कळ दिवस जाईन जाईन म्हणत होतों त्यांना भेटायला! तों एकदांचा जाऊन आलों खरा! एकंदर दोन दिवस राहिलों मडगांवला. शालन् म्हणत होती कीं आणखी १।२ दिवस थांबा. पण इकडचा कामधंदा सोडून मला तिथं अधिक कसं बरं रहातां येईल?" हें बोलतांना जवळच बसलेल्या जुवांववरून त्यानीं एकदोनदां दृष्टी फिरविली.

"मग मडगांवची एकादी हकीकत तर सांगा." कामलता खेळकरपणानें त्यांना म्हणाली.

"ती सांगण्यासाठींच तर मी इथं आलों. पण मी सांगणार असलेली हकीकत मडगांवची नाहीं. कुठ्ठाळच्या तारीवर घडलेला प्रकार

मी तुला सांगणार आहे. बरं झालं मंगेशानं कृपा केली! नपेक्षां आज अगदीं प्राणावर बेतलं होतं—"

" म्हणजे ?"

"—तारच बुडणार होती कुडाळची आज! आम्हीं एकंदर १०।१२ माणसं होतों तारींत. कुडाळचा किनारा सोडून तार आगशीला चालली होती. ऊन अगदीं मी म्हणत होतं. नदी संथ होती. तांडेल वल्हे मारीत होते. तारींत एक फाटकीं तुटकीं वस्त्रें परिधान केलेला शेतकरी होता. तो एकाला आपली कर्मकहाणी सांगत सुटला होता. त्याचा तो 'भोग' ठराविक होता. यंदा शेताला भरपूर पीकच आलं नाहीं, जोतांसाठीं आणलेला आपला एक बैल भलताच चारा पोटीं गेल्यामुळें विषबाधा होऊन दगावला, कर्जाचा बोजा डोईजड झाल्यानें येईल त्या दरानं भात विकून टाकावं लागलं वगैरे गोष्टी तो मोठ्या तन्मयतेनं वर्णन करीत होता. त्याच्याकडे मीहि थोड्याशा उत्सुकतेनं पहात होतों. तोंच अकस्मात तार लवंडल्यासारखी झाल्यानं सर्व मंडळी घाबरून गेली. काय झालं म्हणून जो तो पहातो तो एक ख्रिश्चन बाई तोल जाऊन पाण्यांत पडल्याचं आढळून आलं. लागलीच तिला वर काढण्यासाठीं एका तांडेलानं हातांतील वल्हं बाजूला सारून तत्काळ पाण्यांत उडी टाकली—"

एवढं वासूभट बोलतो आहे, तों जुवांवनं दचकून त्यांच्याकडे पाहिलं. "मग त्या बाईचं पुढं काय झालं ?" असं कां कोण जाणे त्याला विचारावंसं वाटलं. पण त्याचे ते अंतरीचे बोल ओंठाबाहेर कांहीं पडूं शकले नाहींत.

वासू भटजींना तितक्यांत पान खाण्याची लहर आली. म्हणून त्यांनीं कामलतेजवळून पानाचा डबा मागून घेतला. आणि आपण सांगितलेल्या हकीकतीचा पुढील वृत्तांत समजावून घेण्यास ती अतिशय उत्सुक झालेली पाहून त्यांनीं क्षणांत सांगायला सुरवात केली—" हो, काय सांगत होतों बरं ? हं ! अखेर त्या तांडेलानं कसंबसं त्या बुडणाऱ्या बाईला वर काढलं. त्याबद्दल तारींत उपस्थित असलेल्या सर्व मंडळीनं त्या तांडेलाची स्तुति केली. तोंच तार आगशीच्या कांठाला येऊन लागली—सुद्धां. तेव्हां कांहींजण म्हणाले, तार लवंडली याचा सगळा दोष त्या बाईकडेच आहे ! एकजण तर तिचा तो आत्महत्येचा प्रयत्न होता असं धडधडीत म्हणाला. तें कांहींना पटलं, कांहींना पटलं नाहीं. त्या बाईचं नांव होतं कार्मिन—"

ती करुण हकिकत ऐकून जुवांवची स्थिति मोठी विचित्र झाली, त्यानं न राहून वासूभटांना प्रश्न केला—"मग ही बाई गेली कुठें ?"

" पणजीला. आपल्या बापाकडे. जातांना तिनं स्पेशल मोटर केली—"

"—बरं झालं, बिचारी बुडून मेली नाहीं—!!" कामलता एक खिन्न उसासा टाकीत म्हणाली.

---

# अंधारांतील मुसाफीर

## १८

जुवांव विचार करीत अंथरूणावर पडला होता. त्याला आज अनायासेंच कार्मिनची माहिती मिळाली होती. त्या योगायोगाचं त्याला कल्पनातीत आश्चर्य वाटलं. कार्मिन रागानं घर सोडून गेली त्यावेळीं त्याला जितकं वाईट वाटलं तितकंच तिचा आज तलास लागतांच त्याला समाधानही वाटलं. याच पावलीं पणजीला जाऊन आपण तिची भेट घ्यावी आणि आपल्या हातून त्या दिवशीं घडलेली चूक ती विसरून जात असल्यास आपण पुन्हां तिच्याबरोबर संसारांत निमग्न व्हावं असं क्षणभर त्याला वाटलं. आणि दुसऱ्या क्षणीं तो स्वतःच स्वतःशीं हंसला. कारण यापुढं आपण संसाराची स्वप्नें रंगविणें म्हणजे रातराणीचें फुल दिवसा फुलविण्याची आस धरण्याइतकंच कठीण

आहे असं त्याला वाटूं लागलं. आपण गुन्हेगार तशांत फरारी म्हणून जगाकडून यापुढं ओळखले जाणार ही कल्पना त्याला डोळ्याआड करून चालण्यासारखी नव्हती. तो अगदीं बेचैन झाला होता. एवढं मोठं आयुष्य काढायचं! आणि तेंही जगाच्या सहानुभूतीशिवाय! छे! या जगण्यांत मुळींच अर्थ नाहीं! त्यापेक्षां तुरुंग खासच वाईट नाहीं असं तो आपल्या मनाशीं म्हणाला. दुसऱ्याच क्षणीं त्याला असंही वाटलं कीं, तुरुंगांत जाऊन आपण दीर्घकाल सजा भोगावी असा आपण गुन्हा तरी काय केला आहे? गुन्हा केलाच असेल तर तो कायद्याच्या दृष्टीनं, अंतःकरणाच्या सूचकतेनं नव्हे! आपल्या मोटारीखालीं अपघात होणार हें आपणाला काय आधीं कळलं होतं? मुळींच नाहीं! अर्थात् ज्या आपत्तीचा उगम आपल्या हेतुपूर्ण परिस्थितींत नाहीं त्या नजर चुकीचं प्रायश्चित आपण तुरुंगांत देह झिजवित भोगावं ही विषम घटना आपण कां म्हणून मान्य करावी? ही विचारसरणी सुरू झाली आणि पूर्वींप्रमाणेंच तुरुंगांत जाण्याचं वेड त्यानं डोक्यांतून दूर सारलं. मात्र आपण कांहीं महिने गुपचुपपणें इंग्रजींत जाऊन पळून रहाण्याच्या त्याच्या पूर्व विचारांत अर्थातच कांहीं फरक झाला नाहीं. त्यावेळीं त्याला कार्मिनची एकाएकीं आठवण झाली. नुकतीच वासूभटाकडून कुठाळच्या तारीवर घडलेली हकीकत ऐकून कार्मिनविषयीं त्याच्या मनांत थोडीशी अनुकंपा उत्पन्न झाली होती. पण त्या अपघाताचं खरं कारण कार्मिनची पणजीला जाऊन पुन्हां आपण भेट घेतली असतां आपणाला समजून येईल असं त्याला वाटलं. पण आज पणजीला जाण्याच्या मनःस्थितींत तो मुळीं नव्हताच. कारण तसं करूं तर आपण पकडले

जाण्याची त्याला भीति होती. वास्तविक त्याला जर आतां कशाची आत्यंतिक आवश्यकता होती तर ती वेषांतराची होय. पण ती तयारी करण्याप्रीत्यर्थ व इंग्रजींत पळून जाण्याचा आपला मानस पूर्णत्वास नेण्यापायीं लागणारा खर्च त्याच्याकडे आतां कुठं होता ? त्याला यापुढें अन्नूनें जगणेंदेखिल फार कठीण होतं. आयुष्यांत अनेक लटपटी करून वेळोवेळीं तोंडघशीं पडलेला तो एक दुबळा मुशाफीर होता.

तो जेव्हां जेव्हां आपणाला सन्मार्गी कसं बनतां येईल ही आस अंतःकरणांत चितारीत बसायचा तेव्हां तेव्हां तिच्यावर परिस्थितींनं बोळा फिरवायचा असं नेहमींच व्हायचं. जगांत सच्छीलतेची हांव इतकी महाग असते का ? कीं जी विकत घेण्याचं सामर्थ्य गरीबांनाच तेवढं असूं नये ! खरं आहे ! सर्व पापांवर विजय मिळवायला सद्गुणापेक्षां पैशाचीच अधिक आवश्यकता असते खास ! गरीबांकडे तो नसतो म्हणूनच त्यांची पापं वाचाळ बनतात आणि जगाच्या डोळ्यावर पट्टी बांधण्याच्या आणि म्हणूनच त्यांतून परावृत्त होण्याच्या त्यांच्या सच्छील मनोरथांना धक्का मिळतो. ज्या माणसाला सोन्याचा धूर उजाळण्याची ताकद आहे त्यांना मात्र ही आपत्ति फारशी जाणवत नाहीं. कारण निसर्गाला दीपून टाकणाऱ्या धुक्यासारखी झिळझिळीत पडदा टाकण्याची लकब सोन्याच्या धुराला फारच चांगली साधलेली असते. तसं नसतं तर विशाल गतीनं नांदत असलेली आजची सामाजिक विषमता जगांत मुळीं जीवच धरून राहिली नसती! —

त्या रात्रीं जुवांवला झोंप लागली ती सुद्धां अगदींच अपुरी. थोड्याच वेळांत तो जागा झाला. आतां त्याला तिथं थांबावं असं मुळींच वाटेना.

क्षणांत कांहींतरी विचार निश्चित करून जुवांवनं आंगांत कोट चढविला. हळूच जाऊन दार उघडलं. आणि अंधारांतील मुशाफिरी करण्याच्या निमित्तानं कुणाला न सांगता सवरतां तो रस्त्यावर निघून आला.

—आणि त्यानंतर कित्येक महिने तो गोव्यांत चुकूनही कुणाला दिसला नाहीं—

एक दिवस पुन्हां तो गोव्याच्या हद्दींत शिरला. त्यावेळीं त्याच्या अंगावर भगवीं वस्त्रें होतीं. त्याचे केंस आणि दाढी यांचंही बरंच मोठं रान झालं होतं. तो पूर्वीपेक्षां आतां कितीतरी काळाठिक्कर पडला होता आणि त्याच्या देहाचीही भलतीच वाढ झाली होती. येतांना त्यानं सोबत एक कुत्रा आणला होता. त्याच्या गळ्यांतील सांखळीला धरून तो जिथें तिथें फिरायचा. वेषांतराबरोबरच त्यानं आपण मुका असल्याचंही लोकांना भासवायला सुरवात केली होती. कांहीं का असेना, पण त्याची ती साधुपुरुषाची कल्पना त्याला इतकी बेमालूम साधली होती कीं, कितीही धूर्त सरकार त्याची पूर्वीची गुन्हेगारी हुडकून काढण्यास निःसंशय असमर्थ ठरलं असतं.

थोड्याच दिवसांत कुणि एक मुका साधू हिमालयांतून आल्याची वदंता सबंध गोव्यांत हां हां म्हणतां पसरली. आणि तो जिथें होता तिथें त्याच्या दर्शनासाठीं भाविक लोकांच्या झुंडीच्या झुंडी लोटूं लागल्या.

---

# हरवलेली वस्तु

## १९

आज सबंध पणजी शहर उत्साहपूर्ण अशा वातावरणांत निमग्न असलेलं दिसत होतं. आज इंत्रुजचा पहिला दिवस. ख्रिस्ती लोकांचा तो शिमगा. हा सण सबंध गोव्यांत विशेषता शहरांतून मोठ्या थाटमाटानं एकंदर तीन दिवस साजरा केला जातो. बहुतेक पुरुष, बायका नि मुलें ख्रिस्ती रितीरिवाजाप्रमाणें त्या सणांत अहमहिकेनें भाग घेतांना आढळतात.

आजही त्याच परंपरेनुसार शहरांतून उत्साह साजरा केला जात होता.

क्रिस्तांव, मिश्तिस व युरोपियन मंडळी या सणांत एकोप्यानं वागतांना आढळत होती. त्या सर्वांनीं चित्रविचित्र पोषाक केले होते. हौसेला

मोल नसतं याची मूर्तिमंत साक्ष होती ती. कुणि तोंडाला लाली अगर सफेदा फांसला होता. तर कुणि चेहऱ्यावर रुपटीं चढविलीं होतीं. पोरखेळ खेळण्याची त्या जातींत जणूं काय चढाओढच लागली होती. करमणुकीच्या नांवाखालीं जो तो आपलं छोटंमोठं व्यक्तिमत्व पार विसरून गेला होता.

पुरुषांनी बायकांचीं आणि बायकांनीं पुरुषांचीं सोंगं घेतलेलीं दिसत होतीं. त्याचप्रमाणे वृद्धांनीं तरुणांचा आणि तरुणांनीं वृद्धांचा आव आणला होता. एकादी स्त्री अहिल्याबाई होळकरणीसारख्या शूर पेहरावांत वावरत होती तर दुसरी मस्तानीप्रमाणें कृत्रिम दिमाख आणून उल्लु पुरुषांकडे नेत्रकटाक्ष फेकीत होती. कुणि गोकुळांतील कृष्ण बनून हातीं मुरली धरलेल्या स्थितींत हिंदु देवाची थट्टा केल्याचा अविर्भाव चेहऱ्यावर खेळवीत होता तर कुणि दशमुखी रावणाचा अवतार धारण करून आपल्या विराट स्वरूपानें रस्त्यावरील भ्याड मुलांना मधूनमधून भेडसावित सुटला होता. एका मिस्तिसानें तर आफ्रिकेंतील निग्रोची हुबेहुब नक्कल केली होती.

बैलांच्या गाड्या, मोटारी, घोड्याच्या गाड्या नि सायकली इत्यादि वहानें फारच कौशल्यानें शृंगारलीं होतीं. कुणि आपल्या आप्तपरिवारासह एकाद्या मोटारीला तारवाचं रूप देऊन त्यांतून हंसत खिदळत सहल करीत होता. तर कांहीं मित्रमैत्रिणी एका खटाऱ्याला मठाचें रूप देऊन आंत जोगिणीं व संन्यासी म्हणून मिरवित होत्या. रंगीबेरंगी कागदांच्या तीरांनी शृंगारलेल्या एका घोड्यांच्या गाडींत तर पेन्शनींत निघालेल्या कांहीं म्हाताऱ्यांनी ढोल व तासा बडवून हिंदु वाजंत्र्याची नक्कल चालविली होती. तर कुणि सायकलीला गरुडपक्षाचें रूप देऊन

विदुषकाच्या पोषाकांत तिच्यावरून उड्डाण केल्याचं कल्पनासुख अनुभवित होते. कांहींजण दारोदार गायनवादन करून पै पैसा मिळवून सण साजरा करीत होते. तर कांहींजण दुसऱ्यावर पावडर व गुलाल उधळून व पिचकारीतून सुगंध सोडून पैशाची उधळपट्टी करीत होते.

शहरांतील एकदोन नामांकित क्लबांतून तर स्त्री–पुरुषांचे नृत्यप्रकार बँडच्या सुरेल साथींत चालू होते. वाटेंतील हिंदु लोक तें संमिश्र नृत्य पाहण्यासाठीं क्लबाच्या इमारतीबाहेर घोळक्याघोळक्यांत उभे राहून आपल्या आंबट शोकाचं उघडरित्या प्रदर्शन करतांना दिसत होते.

संध्याकाळीं चारपांचच्या दरम्यान शहरांतील कांहीं ठराविक रस्त्यांत शृंगारलेल्या वाहनांच्या नुसत्या रांगाच रांगा लागलेल्या दिसूं लागल्या. आंत बसलेली स्त्री-पुरुष मंडळी, पिठाच्या कागदी नळ्या व पावडरचीं पॉकीटं, लांबचलांब कागदांची रंगीबेरंगी चाकं, पेपरमिंटसच्या वड्या, वगैरे हरतऱ्हेच्या जिनसा एकमेकावर जोरजोरानं फेकूं लागली.

ती गंमत पहात रस्त्याच्या दोन्हीही बाजूला बहुसंख्य हिंदु स्त्री-पुरुष नि मुलें चिक्कार गर्दी करून उभीं होतीं. त्यापैकीं बरीचशीं माणसं रस्त्यावर पडणाऱ्या पेपरमिंटस इत्यादी आकर्षक जिन्नसा हळूच पहाऱ्यावरील पोलीसांचा डोळा चुकवून उचलून आणीत आणि त्यांचा वाढता संग्रह करण्यांत आनंद मानीत.

परिस्थितीच्या कटु अनुभवामुळें ज्याच्या आयुष्यांत अनक स्थित्यंतरें घडलीं आणि ज्याला आपल्या नांवांत तीनदां रुपांतर करणं क्रमप्राप्त झालं तो एकेकाळचा उनाड पोर बेतू, तद्नंतर बाप्तिस्मा घेऊन धर्मलंड बनलेला कपाळकरंटा जुवांव आणि गुन्ह्यावर पांघरूण घालण्यापायीं

साधुवेषांत भटकणारा आजचा महेश्वरीबुवा त्यावेळीं एका नाक्यावर आपल्या कुत्र्यासह उभा राहून रस्त्यावरील ती मजा पहाण्यांत अगदींच तन्मय होऊन गेला होता.

अलिकडेच पणजीमध्यें मधूनमधून त्याच्या खेपा पडूं लागल्या होत्या. प्रथमतः आपणाला कुणि ओळखणार तर नाहींना या शंकेनं तो भयभीत होई. पण अनुभवानें त्याची ती साशंकता फोल ठरली. तो आतां निर्भयपणें जिथं तिथं फिरूं लागला होता. त्यानं मुक्याचं सोंग घेतलं होतं, याचं कारण आपल्या मातृभाषेखेरीज त्याला दुसरी भाषा अवगत नव्हती हें होय. कोंकणी बोलण्याची तर त्याला बिलकुलच सोय नव्हती.

गोव्याच्या हद्दींत पाऊल टाकून त्याला आज जवळजवळ एक महिन्याहून अधिक काळ लोटला होता. तेव्हांपासून 'खऱ्याचें जग नाहीं !' याचा तो अनुभव घेत होता. जग हें मोठं 'गौडबंगाल' आहे असं त्याला वाटे. वेषांतरामुळें दुनियेतील मनुष्यजातीचे कितीतरी विचित्र नमुने तो उघड्या डोळ्यांनीं अलिकडे पाहूं लागला होता. जुन्या गोव्याहून भाणस्तारच्या पुलाकडे जाणाऱ्या पायरस्त्याच्या डाव्या कडेला एका मोकळ्या माळावर एक लहानगा वाडा वसलेला आहे. तेथिल बहुतेक घरें गावडे लोकांची आहेत. घरें कसली म्हणा तीं—जवळजवळ झोपड्याच. असतील तिथं एकंदर १०।१२ कुटुंबं. बहुतेकांचा धंदा शेतीचा. शिवाय तीं सर्वच कुटुंबं हिंदु गावड्यांची. त्या भागाला चारवाडा हें नांव आहे. या वाड्यापासून २।३ डेल्यांच्या अंतरावर तेथिल एका गावड्यानें एक लहानगं रवळनाथाचं देऊळ स्वखर्चानं

बांधलं असून इथं देवाला 'प्रसाद' लावण्यासाठीं लांबूनलांबून लोक येतात. त्या देवळाचा उत्पादक शिपुलो हाच त्या देवळांत देवाला प्रसाद लावण्याचें गांवकाराचं काम करीत असतो. हें देऊळ म्हणजे एक लहानशी कुटी आहे. बाहेर लोकांना बसण्यासाठीं छोटासा मंडप उभारला आहे. सबंध देवळाला सफेत चुना फांसलेला आहे. जवळपास एकही घरदार नाहीं. देवळाच्या समोर एक लांबच लांब खळी असून तिच्यांत कुणि चालतांना पडूं नये म्हणून तिच्या दोन्हीही कडेला निरनिराळ्या झाडांची रांगच रांग उभारली आहे. या खळींत पूर्वी चारवाड्यांतील माणसं शौचाला येऊन बसत. पण पुढें या ठिकाणीं देऊळ झालं आणि लोकांनी तिथं घाण करण्याचं सोडून दिलं.

ज्यावेळीं महेश्वरीबुवा गोव्यांत आला तेव्हां कांहीं निमित्तानं त्यांची या देवळाच्या बाजूनं खेप पडली. आणि सबंध आयुष्य जरी नाहीं तरी कांहीं थोडासा काळ या देवळांत आपणास दिवस काढावयास मिळतील तर मोठीच बहार होईल असं त्यास तें देऊळ पहातांच वाटलं. तो एकांत त्याला भलताच मानवला. आणि त्याचं भाग्य असं कीं, देवळाच्या मालकाशीं त्यानं त्यासंबंधी मुक्याच्या खुणेनं विचारपूस केली असतां त्याला त्याच्याकडून आशादायक असं उत्तर मिळालं. शिपुलो म्हणाला " देऊळ तुमचंच आहे! तुमच्यासारख्या साधुसंताचे पाय या देवळाला लागणं हें मी माझं मोठंच भाग्य समजतों! वाटल्यास मी तुम्हांला रहाण्यासाठीं लवकरच या देवळाच्यामागें एकादी चुडतांची झोंपडी बांधून देईन. पण तुम्हीं येथें फार दिवस रहात असाल तर! "

यावर महेश्वरीबुवा खुणेनं त्याला सांगूं लागला—" मी जगांत सर्वस्वी

एकटा आहे! मी जिथं जातों तें माझं घर! इथं रहायला मिळालं त
इथं राहीन! एकूण कुठेंतरी रहायचंच ना! देवाच्या पायाशीं रहाण्यांत
साधुसंताना खरा आनंद असतो! शिवाय येथला एकांत मला विशे
प्रिय वाटला म्हणूनच इथं रहाण्याची मी इच्छा व्यक्त केली. रोज दो
वेळां मला जेवायला मिळालं, रात्रीच्या वेळीं निवांतपणें झोंप घेतां आली, f
मध्यंतरीचा वेळ ईश्वरभक्तींत घालवितां आला तर माझ्यासारखा पुण्यशाल
मीच! मात्र इथं रहायचं तर माझ्या पोटापाण्याची कांहींतरी व्यवस्थ
होणं जरूर आहे. येवढी जबाबदारी तुम्ही आपल्या शिरावर घे
असल्यास परमेश्वर तुम्हांला सदासर्वदा संतुष्ट राखील—"

शिपुल्या गावकारानं महेश्वरीबुवांना त्याबद्दल पूर्ण निर्धास्त रहाण्या
सुचीवलं.

दिसायला जरी त्याची ही दृष्टि औदार्याची होती तरी तो मोठ
व्यवहारी मनुष्य होता.

बुवा आपल्या देवळांत रहात आहे याचा आपण कसाकाय फायद
करून घ्यायचा हा व्यापारी तर्कच त्याच्या त्या औदार्याच्या मुळाश
होता. संताच्या पुण्याईवर त्याला आपल्या देवळाचं वैभव वाढवायच
होतं. मातींतून सोनं काढायची कला त्याला आत्मसात करायची होती.

—आणि अखेर घडलं तेंही त्याच्या मनाजोगतंच—

महेश्वरीबुवा त्या देवळांत रितसर स्थायिक होतांच शिलपुया गावकारा
त्याच्याबद्दल भलतीच वदंता गांवागांवांतून पसरण्याची शक्कल साधली
बुवाजी एकंदर १३ महिने आणि १३ दिवस या देवळाच

आसऱ्याला रहाणार आहेत असं तो ज्याला त्याला सांगूं लागला. त्याचं कारण इथं तितकी मुदत वास्तव्य करण्याबद्दल त्यांना आपल्या दिवंगत गुरूंचा स्वप्नांत साक्षात्कार झाल्याची त्यानं थाप मारून दिली. तदनंतर बुवाजीनं कुठं निघून जावं यासंबंधीं ही १३ महिने १३ दिवसांची मुदत उलटतांच त्यांना पुन्हां गुरूमहाशयांचा स्वप्नांत साक्षात्कार होईल वगैरे स्वतःच्याच कल्पना त्यानं प्रसूत केल्या. शिवाय महेश्वरीबुवा हे आत्मज्ञानी असून मनुष्याच्या मनांतील एकूण एक गोष्टी न सांगता ओळखूं शकतात, आणि त्याबद्दल लोकांना सल्लाही पण देऊं शकतात, असाध्य असे रोग आपल्या नुसत्या वाणीनं बरे करूं शकतात वगैरे अद्भूतरम्य गोष्टी उठतां बसतां श्रद्धाळू लोकांना तो सांगू लागला. साहजिकच या जाहिरातबाजीचा गांवोगांव प्रचार होऊन कांहीं दिवसांनीं महेश्वरीबुवाच्या दर्शनासाठीं लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्या देवळाकडे लोटूं लागल्या आणि त्यांच्या पुढ्यांत रोज पैशांचा आणि निरनिराळ्या वस्तूंचा पाऊस पडायला सुरवात होऊन कांहीं दिवसांनीं त्या बुवाबाजीच्या नाटकाचा कळस होणार अशीं स्पष्ट चिन्हं दिसूं लागलीं. साहजिकच पूर्व कल्पना नसतां महेश्वरीबुवांना भक्तगणांच्या आकांक्षापुढें मान तुकविणें क्रमप्राप्त होऊन शिपुल्या गांवकराच्या व्यावहारिक सल्ल्यानुसार त्याला आपलं धोरण ठेवावं लागलं.

एक प्रकारें त्यानं जगावर चालविलेला तो सूडच होता.

उपाशीं पोटीं दोन प्रहरीं दारांत येणाऱ्या भिकाऱ्याला ' पुढें जा ! ' म्हणून निर्दय सूचना करणारे, स्वतःच्या भाटांत खोरेंकुदळ घेऊन श्रमणाऱ्या मानार्यांच्या मजुरींत काटाकाट करणारे लोक अंधश्रद्धाळू बनून

आज त्याच्यापुढें न मागतां सवरतां पैशांची धार ओतीत होते. जें कधीं मागून मिळालं नसतं तें त्याला आज लबाडीच्या जोरावर हात न पसरतां मिळत होतं. जितके दिवस ही लूट करतां येईल तितके दिवस ती करावी अशा रीतीची विचारसरणी सुरू होऊन महेश्वरी बुवा आतां पैशांच्या मागें लागला होता.

पण पैशांबरोबर त्याला दुसऱ्याही एका गोष्टीची जरूर होती. आणि ती म्हणजे कार्मिनला जाऊन भेटण्याची. त्यासाठीं तो जवळजवळ अनेक वेळां पणजींत येऊन गेला. पहिल्यावेळीं मार्केटाच्या बाजूनं जाऊन त्यानं पुजातावरून दृष्टि फिरवली. पण तिथं पुजात आतां नव्हतं. तें पाहून त्याला किंचित धक्का बसला. त्यानं युक्तिप्रयुक्तीनं मुकेपणानंच मिळवतां येण्यासारखी माहिती मिळवली. आणि त्याला दोन महिन्यापूर्वींच सांतान कॅन्सरच्या विकारानं वारल्याचं कळलं. साहजिकच कार्मिनला भेटण्यास तो उत्सुक झाला. पण ती तूर्त कुठं आहे, काय करते वगैरे त्याला कांहींच सुगावा लागला नाहीं. बरं, त्यासंबंधीं कुणाला स्पष्ट विचारण्याचीही सोय नव्हती. त्यानंतर एकदोन वेळां पणजींत येऊन कार्मिन कुठं दिसते किंवा काय हें तो पाहून गेला. पण छे! ती त्याला शोधूनही कुठं सांपडेना. तिला भेटण्यांत त्याचे अनेक उद्देश होते. घरांतून गेल्यावर तिला आपल्या कृत्याचा कधीं पश्चात्ताप झाला असेल का? आपण मोटारीवर नोकरीला असतांना तिच्याखालीं झालेल्या अपघातामुळें आपणास फरारी व्हावं लागलं या विषयीं तिला कांहीं माहिती असेल का? ती सध्या काय करीत असेल? कुठं रहात असेल? तिची आपली यापुढं

भेट झाली तर ती आपणाबरोबर पुन्हा संबंध ठेवायला तयार होइल का? वगैरे प्रश्न तो आपल्या मनाला एकांतात बसला असतां विचारी.

आज पणजींत इंत्रुज असल्याचें त्याला माहित झाल्यानें कदाचित चुकून कार्मिन रस्त्यांत आपल्या नजरेस पडली तर पहावी म्हणून तो मोटारींतून पणजीला आला होता.

जवळ जवळ अंधार पडेपर्यंत तो रस्त्यावरील इंत्रुजाची गम्मत पहात होता.

पण त्याचा तिथं उभा रहाण्याचा हेतु कांहीं सफल झाला नाहीं.

शेवटीं कंटाळून तो आपल्या मुक्कामीं जाण्यासाठीं हातांतील कुत्र्याला बरोबर घेऊन मोटरस्टँडच्या दिशेनें जाऊं लागला. तोंच एक बाई रस्त्यांवरील दिव्याच्या उजेडांत आपणासमोरून येत असलेली त्याला दिसली. तिच्या केंसावर आणि पोषाकावर कुणितरी पावडर आणि लाली उधळली होती. तिचा पोषाक अगदीं साधा होता. ती घाईघाईनं कुठंतरी चालली होती.

महेश्वरीबुवा त्या बाईकडे पाहतच राहीला. तो आपणाकडे असा डोळे फाडून का पहातो याचं त्या बाईलाही आश्चर्य वाटलं. ती वांकड्या नजरेनं भयाभीत होऊन त्याच्याकडे पाहूं लागली.

ती कोण हें ओळखायला महेश्वरीबुवाला विलंब लागला नाहीं. आश्चर्य आणि भीति या संमिश्र भावनेनं तो क्षणभर बुचकळ्यांत पडला. त्याला संशय राहिला नाहीं. ती तीच होती हें त्यानं ओळखलं हरवलेली वस्तु अचानकपणें हाताला लागल्याचं पाहून कुणाला आनंद होणार नाहीं ? अर्थात त्यालाही तो झालाच.

बाई पुढेंपुढें जात होती.

बुवा मागून चालला होता.

बाई मागं वळूनवळून पहात होती.

बुवाची पावलं वेगानं रस्त्यावर पडत होतीं.

कांहीं पुढं गेल्यावर जवळपास कुणीच नाहीं असं पाहून त्यानं तिला साद घातली—" कार्मिन ! "



# अकल्पित संकट

## २०

आपल्या नांवापाठोपाठ आपणाकडे चालून येत असलेल्या त्या साधुवेषांतील पुरुषाकडे पाहून कार्मिन किंचित बुचकळ्यांत पडली. एरव्हीं त्या विचित्र माणसानं आपणास हांक मारलेली पाहून ती साहजिकच घाबरली असती. पण आज तसं भिण्याचं तिला बिलकुल कारण नव्हतं. कारण आज इंत्रूजाचा दिवस होता. कुणि तरी ओळखीच्या मनुष्यानं इंत्रूजाच्या निमित्तानं हें बैराग्याचं सोंग घेतलेलें आहे अशी तिनं आपल्या मनाशीं कल्पना करून घेतली. आणि हांक मारणारी व्यक्ति जवळ येईतोंवर ती जिथल्या तिथेंच उभी राहिली.

महेश्वरी बुवाच्या हातीं बरोबरच्या कुत्र्याची सांखळी होती. त्या तशा स्थितींतच तो कार्मिनजवळ आला. कार्मिन त्याला त्या वेषांत ओळखणं शक्य नव्हती. पण जेव्हां त्याचा परिचित आवाज तिच्या कानीं पडला तेव्हां मात्र ती इतकी कांहीं दचकली कीं, आपण स्वप्नांत तर नाहींना असा तिला क्षणिक भास झाला.

रागाच्या अनावर धुंदींत संसारांतून उठून गेल्यावर ती जेव्हां पुन्हां पणजीला आली तेव्हां जुवांवच्या मोटारीखालीं घडलेल्या अपघाताची बातमी व आपण पोलीसांच्या हातीं लागू नये म्हणून तो कुठंतरी फरारी झाल्याचं वृत्त तिच्या कानावर आलं होतं. त्यानंतर कित्येक महिन्यांनीं आज ती त्याला पहात होती.

बराच वेळ तीं दोघं रस्त्यांत बोलत उभीं होतीं. इंत्रूजाचा दिवस असल्यानं कार्मिनशीं बोलत असलेला तो बैरागी म्हणजे एक फरारी झालेला इसम आहे असं खात्रीनं सांगणं फार कठीण होतं. त्यामुळें जवळून जाणारीं माणसं तीं इंत्रूजांतील सोंगं आहेत अशीच त्याच्याविषयीं फार तर कल्पना करून घेत.

त्यांचं चालू असलेलं बोलणं लवकर संपण्यासारखं नव्हतं. म्हणून कार्मिन जुवांववरील परिस्थिति ओळखून म्हणाली—"आतां इथं अधिक वेळ थांबण्यांत अर्थ नाहीं. आपणाला अजून पुष्कळ बोलायचं आहे असं तुझ्या आतांच्या बोलण्याकडे पाहून मला वाटतं. मग तूं माझ्या खोलीवर चालतोस का? जें कांहीं आपणाला बोलायचं आहे तें तिथं आपण बोलूंया. माझं बिऱ्हाड अगदींच एकांतांत आहे. मी सांतइनेझला रहातें."

" हरकत नाहीं. तूं म्हणतेस तिथं मी येईन—"

" मग असं कर. मी थोडी पुढें जातें. तूं मागाहून ये. "

ठरल्याप्रमाणें कार्मिन पुढें आणि जुवांव मागें याप्रमाणें तीं चालूं लागलीं.

कांहींवेळानें तीं दोघं बिऱ्हाडीं येऊन दाखल झाली.

त्यावेळीं त्यांना घरांत शिरतांना पहाणारी एकच व्यक्ति जवळपास होती. आणि ती म्हणजे महालक्ष्मीच्या देवळांत सनई वाजविणाऱ्या रामू देवळ्याची. कार्मिन रहात होती त्या घरापासून त्या देवळ्याचं घर जवळजवळ एका उल्याच्या अंतरावर होतं. रामू देवळी हा मनुष्य अस्सल दारूडा होता. त्यानं एक बाई 'ठेवलेली' होती. ती चार दिवसांपूर्वी गांवीं निघून गेल्यानें परवांच्याच रात्रीं रामू देवळी एकाएकीं कार्मिनकडे आला आणि कांहींतरी अचकट विचकट असं तिच्याशीं बोलूं लागला. तिनं तो दारू प्यालेला आहे हें तेव्हांच ओळखलं. त्यामुळें ती साहजिकच त्याच्यावर चिडली. आणि तो ज्या उद्देशानं तिच्याकडे आला होता त्या त्याच्या गैरसमजाबद्दल तिनं त्याची चांगलीच हजेरीही पण घेतली. त्यानंतर नाक मुठीत धरून रामू देवळी निघून गेला होता.

तो आतां एका आंब्याच्या झाडाखालीं काळोखांत उभा होता. त्याची दृष्टि कार्मिनच्या बिऱ्हाडाच्या दरवाजावर खिळली होती. तो कसला तरी विचार करीत होता. कां कोण जाणे तो हळुहळू त्या बाजूनें पुढें सरकूं लागला.

जुवांवसह आंत जातांच कार्मिननं तत्काळ दार लावून घेतलं. त्यानंतर तीं दोघं बोलत बसलीं. घरीं येतांना रामू देवळ्याच्या दृष्टींतून तीं दोघं जरी निसटलीं नव्हतीं तरी रामू देवळी मात्र त्यावेळीं तिच्या नजरेस पडला नव्हता एवढं खरं. फार दिवसांनीं तीं नवराबायको एकमेकांना भेटत होतीं. सांडलेले दोन जीव आज एकत्र आले होते. अंतर्यामीं तुंबलेलीं दुःखं तीं एकमेकांना बोलून दाखवित होतीं. तोंच—

रामू देवळी मंद पावलं टाकीत तिच्या दाराशीं आला. जवळपास आपणास कुणि पहात तर नाहीं ना अशी खात्री करून घेतल्यावर त्यानं हळूच दाराजवळ कान नेले. तो ऐकूं लागला.

जुवांव कार्मिनला सांगत होता—" तूं घर सोडून गेली नसतीस तर कदाचित ही परिस्थितीच माझ्यावर येतीना ! मी संतापून तुझ्या थोबाडीत मारली त्याचं पर्यवसान तुझ्या गृहत्यागांत होईल याची मला कल्पना कशी असणार बरं ? मी केलेलं तें कृत्य चुकीचं असेल पण ती चूक माझ्या हातून का घडली याचा तूं विचार केला होतास का ? माझ्यासाठीं तूं आणि तुझ्यासाठीं मी काय केलं नाहीं ? एकमेकांच्या उपयोगीं पडतांना आम्हां उभयतांच्या भूमिका स्वार्थत्यागावर आधारलेल्या होत्या ! आपण दोघंही पापी होतों ! म्हणूनच तर एवढा मोठा स्वार्थत्याग करण्याइतकी आपली मजल गेली ! आपण एकमेकांचीं पापें पोटांत घातलीं आणि एकमेकांना क्षमा केली ! काजार झालों ! त्यामुळें आपापल्या जातीचा आपणाला बळी द्यावा लागला ! त्यामुळं लोकांच्या सहानुभूतिऐवजीं आपण त्यांच्या तुच्छतेचा विषय होऊन बसलों ! पण अखेर अनुभव काय आला ? काजारानंतर तूं आपलं मित्रत्वाचं नातं विसरून माझा

यत्किंचितही अपराध नसतां माझ्याशीं वैऱ्याच्या नात्यानं वागूं लागलीस! काजाराचं समाधानच मला कधीं लाभूं दिलं नाहींस! नेहमीं पहावं तेव्हां तूं आपली विचारांत गर्क! जणुं संसारांत माझी तुला गरजच नाहीं अशा अविर्भावानं तूं वागायची! अशावेळीं मला संताप येणं हें मनुष्य स्वभावाविरुद्ध होतं का?—"

"—पण त्याबद्दल मी तुला दोषच देत नाहीं! दोष तुझा नसून माझा होता! मला तें कळत होतं! तरीहि मी घर सोडून गेलें—"

"कां बरं?"

"त्याला कारण होतं! मी माणुसकीला विसरलें होतें! खरं खोटं याच्यांतील अंतर मला त्यावेळीं उमजलं नाहीं! भावनेच्या आहारीं गेल्यामुळें तशी चूक माझ्या हातून घडली ही गोष्ट खरी आहे! पण त्याचा पश्चाताप मला नंतर झाला! कसं आणि कोणत्या तोंडानं तुला सांगूं? लग्नापूर्वी ज्या माणसावर आषक्त बनून मी माझ्या पावित्र्यावर निखारा ठेवला त्याच माणसाविषयींचें कुतुहल मनांतून दूर न झाल्यामुळें मी काजारानंतरही त्याचा ध्यास धरून बसलें होतें! तें वेड डोक्यांतून काढून टाकणं मला कठीण होत होतं! आणि म्हणूनच मी तुला दुःखी केलें! मनांत एक नि वर्तन निराळंच अशा परिस्थितींत येऊन मी पडलें! तुझा घात केला! ज्या दिवशीं तुझा संबंध झुगारून मी घरांतून निसटलें तेंही त्या माणसावरच विसंबून! आज त्या गोष्टीचा मला पश्चाताप होतो आहे! अनुभवानें माझे डोळे उघडले! मी आसऱ्याला गेलेला मनुष्य आधींच लग्नबंधनानं जखडला होता! तो माझं दर्शन घ्यायलाही तयार होईना! आपल्या सुरळीत चाललेल्या संसारांत त्याला मीठ कालवायचं

नव्हतं ! म्हणून आल्या पावलीं परत जाण्यास मला त्यानं आपल्या नोकराकडून हुकूम पाठविला ! मी शरमून गेलें ! माझ्या मुर्खपणाची मला कींव आली ! जुवांव, त्यानंतर मी पुन्हां तुझ्याकडे यायला निघालें ! मडगांवला रस्त्यांत एक बाई भेटली ! ती त्या गांवची सून व आमच्या पोंबुर्पेंची मुळगी होती ! बऱ्याच वर्षांनीं आमची भेट होत होती ! तिनं विचारलेल्या प्रश्नांना मी खोटींच कांहींतरी उत्तरं दिलीं ! ती मला आपणाकडे दोन दिवस पाहुणचार घेण्यास आग्रह करूं लागली ! मला तिचा शब्द मोडवेना ! अखेर मी तिला होकार दिला ! तिच्याबरो-बर तिच्या घरीं गेलें ! दोन दिवस तिथें राहिलें ! आणि तिसऱ्या दिवशीं मडगांव सोडलं ! मी कुडाळीला आलें तेव्हां एका ड्रायव्हरनं तुझ्या मोटारीखालीं अपघात घडल्यानें तूं आजच फरारी झाल्याची मला बातमी दिली ! ती ऐकून मला धक्का बसला ! घडलेली चूक उघडपणें तुझ्यासमोर मांडून त्याबद्दल तुझ्याशीं क्षमेची याचना करावी हा पणजीला तुझ्याकडे परत येण्यांत माझा भावार्थ होता ! पण जेव्हां माझे ते मनोरे फोल आहेत असं मला कळून चुकलं तेव्हां नशिबाला दोष देण्यापलिकडे मी दुसरं कांहीं केलें नाहीं ! आतां पणजीला येण्यांत मला एकच काय तो आधार होता ! तो म्हणजे माझ्या वडिलांचा ! मी गृहत्याग केल्याचं कळतांच ते भलतेच संतापले असतील याची मला जाणीव होती ! त्यांच्याकडे त्या लाजिरवाण्या परिस्थितींत जाणं ही मला भलतीच आपत्ती वाटली ! पण काय करणार ! कुठें जाणार ? वडिलांकडे न जावं तर जगांतील दुसरा कोणता दरवाजा मला उघडा आहे यासंबंधीं मी विचार केला ! पण व्यर्थ ! शेवटीं मी कंटाळलें ! आणि वडिलांकडेच

जायचं असा मनाचा निश्चित निर्णय घेऊन मी कुड्डाळच्या तारींत एकदाचं पाऊल टाकलं! तार आगशीच्या किनाऱ्याकडे जात होती! माझं मन पुन्हां उंचबळून आलं! डोक्यांत कसल्यातरी विचित्र कल्पना थैमान घालीत होत्या! खरं सांगू तुला? मला अकस्मात जीवाचाच कंटाळा आला! वाटलं, नको आतां कुठें जाणें! त्यापेक्षां तोल गेल्याचं खोटं नाटक करून आपण नदींत घालून घ्यावं हेंच उत्तम! आणि मी क्षणांत ते मनांतील गुप्त बेत प्रत्यक्ष कृतींत उतरून मोकळेंही पण झालें! पण मी मरावें अशी देवाची कुठं इच्छा होती? मी पाण्यांत घालून घेतलं तोंच तारीवर वल्हे मारणाऱ्या एका माणसानें मला वांचविण्यासाठीं पाण्यांत उडी टाकली! त्यानं मला बुडायला दिलं नाहीं! तो मला तारीवर चढवून मोकळा झाला! लोकांनीं माझा तोल गेल्याची कल्पना केली! त्यापैकीं एकानं बहुतेक माझं बिंग ओळखलं असावं असं मला वाटलं! मीं आगशीला येऊन पडलें! कांहीं वेळानें मी मोटारींतून पणजीला गेले—"

"—ही बातमी त्याच रात्रीं मंगेशीला एका भटाकडून मला कळली. हा भट त्याच तारींत होता. आठवण्याचा प्रयत्न केल्यास तुला त्याची स्मृति होईल कदाचित—"

"होय!" कार्मिन चेहऱ्यावर मंद हास्य खेळवून म्हणाली—"होता खरा असा एक भट त्या तारींत!"

"त्यावेळीं तुला पणजीला येऊन गुपचुपपणें भेटण्यास मी किती उत्सुक होतों! पण माझी परिस्थितीच त्या प्रसंगीं इतकी बिकट होती कीं मनांत असूनही मला तसं करतां येणं शक्य नव्हतं! त्याचे दुसरेच दिवशीं मी इंग्रजींत पळून गेलों! कित्येक महिन्यांनीं संन्याशाच्या

या भगव्या वस्त्रांत पुन्हां गोव्यांत प्रवेश केला! तोही मुका म्हणून! इंग्रजींतून मी परत गोव्याची हद्द ओलांडली तेव्हां माझ्यांत भलताच फरक झालेला होता. इतका कीं, मी आपण होऊन तुला माझा आज परिचय करून दिला नसता तर तुझीसुद्धां मला ओळखण्याची छाती नव्हती, होय ना?"

"खरं आहे! प्रथम तर माझा तुझ्या शब्दावर विश्वासही बसला नाहीं! नंतर एकेका गोष्टीचा उलगडा झाला म्हणून तुझी ओळख पटली—"

"आज बरेच दिवस झाले मी महेश्वरीबुवा या खोट्या नांवानें गोव्यांत वावरतों आहे! सध्या माझा मुक्काम चारवाडा या ठिकाणीं असून मला लोकांनीं जवळजवळ 'बुवा' बनविलं आहे! परिस्थितीनं मलाही लोकांच्या त्या श्रद्धाळूपणाचा फायदा घेणं क्रमप्राप्त झालं! आज मला पैशांची टंचाई नाहीं. अल्पावधींतच माझा हा धंदा इतका लोकप्रिय होऊन राहिला आहे कीं, कांहीं दिवसांनीं लोक माझ्यामागें वेडे होऊन जातील अशी मला आतांच शंका यायला लागलेली आहे! इथं आल्यापासून मी निदान २।३ वेळां तरी तुझी भेट व्हावी म्हणून पणजीला आलों असेन! पहिल्याच दिवशीं जेव्हां मी मार्केटच्या बाजूनं फिरकलों तेव्हां पुजात बंद असल्याचं पाहून मी गोंधळांत पडलों! पुढें तुझा वडील कॅन्सरच्या विकारानें कालवश झाल्याची दुःखकारक बातमी मला कळली आणि तुझ्या भवितव्याविषयीं मला चिंता वाटूं लागली. मोठ्या युक्तीनं मी त्यावेळी तुझी चौकशी केली. तेव्हां तूं पणजींतच कुठंतरी रहात असल्याचं मला माहित झालं. पण नक्की पत्ता कांहीं कळेना!

त्यानंतर पुन्हा एकदां तुझा शोध काढीत पणजींत आलों. त्यावेळींही निराशेनंच परत फिरावं लागलं! आज इंत्रूज असल्यानं त्या निमित्तानं तरी तुझी रस्त्यांत कुठंतरी गांठ पडत असल्यास पहावी म्हणून आज पुन्हां पणजीला आलों! सुदैवानं माझे ते मनोरे सफल झाले! अंतः- करणांतली फार दिवसाची आशा आज पुरी झाली."

"जुवांव, तूं फरारी झाल्यामुळें पोलीसांनी मला व माझ्या वडिलांना किती त्रास दिला याची तुला कल्पना आहे? मोटर बेपत्ता केल्यामुळें तुझा मालक तर तुझ्यावर इतका चिडून गेला होता कीं, सांपडल्यास तुझ्यावर गोळी झाडण्याची भाषा तो एकदां पुजातावर आल्यावेळीं माझ्याजवळ बोलला! त्यानंतर कित्येक दिवस पोलीस तुझा शोध काढीत पुजातावर नियमानें येत होते. मी त्यांना खरी गोष्ट सांगितली. पण ते त्यावर थोडाच विश्वास ठेवतात! तूं कुंडईच्या घांटीवर सोडलेली मोटर दुसरेच दिवशीं पोलिसाच्या हाताला लागली, ती कित्येक दिवस त्यांच्याच ताब्यांत होती. पुढें ती मोठ्या महत्प्रयासानं मालकाची मालकाला मिळाली असं म्हणतात. त्यानंतर मात्र पोलीस लोक सहसा पुजाताच्या बाजूनें फिरलेले नाहीं! तूं कुठं गेलास हें कळायला तर बिलकूल मार्ग नव्हता! ते दिवस माझे अतिशय दुःखांत गेले! कांहीं महिन्यांनीं बाप मृत्युमुखीं पडला आणि त्या निमित्तानं पुजातही कायमचंच बंद झालं! मी उघड्यावर पडलें! त्यानंतर या अशा स्थितींत दिवस कंठतें आहे! वडिलाच्या पश्चात हातीं लागलेल्या कांहीं तुटपुंज्या रकमेवर हे आजचं जिणं कसंबसं जगतें आहे! ऐकलीस माझी कर्मकथा?..."

त्यानंतर त्या दोघांत आणखीही बरींच बोलणीं झालीं.

कांहीं वेळानें कार्मिन भिंतीवरील एका लहानग्या आरशासमोर जाऊन उभी राहिली व तींत आपल्या चेहऱ्याचं निरीक्षण करीत तिनं सांगायला सुरवात केली—" सहज इंत्रूजाची मिरवणूक पहायला म्हणून गेलें होतें ! रस्त्यांत त्या मेल्या एकानं पावडरीनं मला नुसतं न्हाऊ घातलं ! मला असा राग आला होता त्याचा ! पण करणार काय ? इंत्रूजाचा दिवस पडला ! "

एवढं ती बोलते आहे तोंच जवळच उभा असलेल्या जुवांवचं लक्ष एका कोनाड्यांतील खिडकीकडे गेलं. तिथं एक बाटली होती. तींत काय आहे हें पाहाण्यासाठीं जुवांवनं त्या बाटलीचं बूच उघडून हळूच तिच्याकडे तोंड नेलं आणि ती दारू असल्याची त्यानं खात्री करून घेतली. त्यानं ती बाटली तशीच हातीं धरून कार्मिनला विचारलं—" ही दारू इथं कोण पितो ?"

" मी स्वतःच ! "

" तूं ? "

" होय ! "

" इथपर्यंत तुझी मजल गेली तर ? "

" काय करूं ? बाप मेला ! तूं फरारी झालास ! ज्या मनुष्यावर आषक बनून मी संसाराकडे पाठ फिरविली त्या निर्दयानेंही माझ्याशीं बेइमानीचं वर्तन केलं ! जगांत जवळचा असा मला कुणिच राहिला नाहीं ! अशा पश्चात्तापदग्ध परिस्थितींत अंतःकरणांतील आग शमवण्यासाठीं आयुष्यांत तोंडघशी पडलेल्या माझ्यासारख्या मुलीनं दारूचा स्विकार करावा यांत विशेष काय आहे ? पश्चात्तापावर जय मिळविणारी

दारू इतकी लोभनीय आणि सहजसाध्य वस्तु जगांत दुसरी कोणती असेल तर त्याची मला बिलकुल कल्पना नाहीं! म्हणूनच दारू ही मला प्रिय वाटली! रोज न चुकतां मी हल्लींशा दारू पितें! खोटं कशाला सांगू? ती घेतली म्हणजे जरा बरं वाटतं?"

कार्मिनचं तें म्हणणं जुवांवला विचारांती तितकंसं खोटं वाटलं नाहीं. परिस्थितीच्यापायीं आयुष्यांत नाडलेला मनुष्य प्रसंगी शेणांतल्या किड्याप्रमाणें किती हीन दशेला पोंचतो हा स्वानुभवाचा धडा त्यानंही जीवनांत गिरविला होता. त्यामुळं कार्मिन त्याच्या तिरस्कारास पात्र ठरण्याऐवजीं त्याच्या हळुवार हृदयाची सहानुभूति मात्र मिळवून बसली. जुवांवनं डाव्या हातीं असलेली ती बाटली किंचित वर धरून एकवेळ तिच्याकडे डोळे वटारून पाहिलं व दुसऱ्याचक्षणीं आपली दयार्द्र दृष्टि त्यानं कार्मिनच्या चेहऱ्यावर खिळवली. एक दीर्घ निश्वास टाकला. आणि दाटून आलेल्या गळ्यावाटे कातर आवाजांत तो म्हणाला—"कांहीं नाहीं! आजपासून दारू पिणं बंद! हिचा नाद तुला यापुढें कायमचा सोडला पाहिजे! तुझ्या स्वतःकरितां आणि वाटलं तर माझ्यासाठींही!"

"काय म्हणालास तूं! तुझ्यासाठीं मी दारू वर्ज्य करूं? केली असती! पण तूं यापुढें सतत मला जवळ घेऊन बसला असतास तर! संसाराच्या पिंजऱ्यांत आपण उभयतां पुन्हां अडकून पडलों असतों तर! पण तें आतां शक्य नाहीं!—"

"शक्य नाहीं?...कां..."

"याचं कारण तूं गुन्हेगार आहेस! सरकारची तुझ्यावर करडी नजर आहे! गुन्ह्यांतून मुक्त होण्यासाठीं तूं फरारी झालास त्याचं शासन

सरकार तुला तुरुंगांत पाठवून भोगायला लावील ! ! तुझं कर्म तुला स्वस्थ बसूं देणार नाहीं ! पोलीस तुझ्या शोधांत आहे ! अशा स्थितींत तुला आणि मला एकत्र कसं बरं रहातां येणार ? कोलमडलेला संसार पुन्हां उभारावयाचा म्हणजे आपणाला एकत्र राहिलं पाहिजे ! आणि तुझी आजची परिस्थिति तर तसं करणं आपणाला शक्य नाहीं असं मला स्पष्ट बजावून सांगते आहे–"

"तुझी ही कल्पना तितकीशी बरोबर नाहीं ! त्याला उपाय आहे ! कसा तो तुला सांगतो ! पण त्यापूर्वी मला हें सांग कीं, खरोखरच माझ्याबरोबर रहायची तुझी इच्छा आहे का ?"

"निःसंशय !"

"कार्मिन, माझं स्वप्न एकूण खरं ठरणार तर ? कित्येक दिवसा-पासून तुझी पुन्हा भेट झाल्यास तुला हीच विनंती करायची अशा रीतीचें मांडे मी मनाशीं खात होतों ! त्या गोष्टीला तूं आज विचारण्या-पूर्वींच उत्तेजन दिलेलं पाहून मला वाटूं लागलं आहे कीं, आपणां उभयतांचं आयुष्य हें लौकिक दृष्ट्या जरी एक मोठं 'गालबोट' असलं तरी तुझ्या माझ्या दाट मैत्रीच्या जोरदार संघटनेवर संभावित जगाला आपण यापुढं असं दाखवून देऊं कीं, पाप करणाऱ्यालाच पुण्यावर आपला हक्क सांगता येतो ! जो आयुष्यांत एकदांही पाप करीत नाहीं त्याला पुण्यावरही हक्क सांगता येणार नाहीं ! हें तत्वज्ञान ज्यानं आत्मसात केलं त्याला आपल्या आयुष्यांतील केवढंही मोठं गालबोट पुसून टाकणं अशक्य नाहीं–"

"पण तुझा हा संकल्प व्यवहारांत यशस्वी होणं शक्य आहे का ?"

" कां नाहीं? जगांत सुरवातीस अशक्य वाटणाऱ्या गोष्टींतूनच नेहमीं शक्यतेची वळयें निर्माण होत असतात! मात्र त्यासाठीं आपणाला एकच गोष्ट करावी लागेल—"

" ती कोणती, जुवांव?"

" गोव्याची हद्द ओलांडून आपण कुठंतरी दूरवर पळून जाण्याची! ही एवढी गोष्ट केली कीं आपण निःसंशय सुखी झालों असं समज! हिंदुस्थानच्या कुठल्याही दूरच्या भागांत आपणा उभयतांना पळून जाण्याइतका माझ्याकडे पैशांचा आज खासच तुटवडा नाहीं! तुला खात्री करून घ्यायची आहे का? मग पहा" असं म्हणून त्यानं कफनीच्या आंतील खिशांतून तिला एक नोटाचं जाडजूड पुडकं काढून दाखविलं आणि तो पुढं म्हणाला " हे एवढे रुपये मी कुठून आणले तुला माहित आहे? हें सगळं धन मी बुवाबाजीवर कमविलेलं आहे! मूर्ख जगाच्या अंधश्रद्धाळूपणाचा हा रोखठोक नफा आहे! मला ठाऊक होतं कीं एक दिवस आपलं बुवाबाजीचं बिंग फुटणार आणि आपणाला गोव्याला कायमचा रामराम ठोकावा लागणार! तो प्रसंग जरी माझ्यावर अद्यापि आला नसला तरी लवकरच येईल याबद्दल मला संशय नाहीं! म्हणूनच मी खिशांत ठेवलेल्या या सगळ्या नोटा आयत्यावेळीं धांदल उडूं नये याकरितां आगाऊच इंग्रजी करून ठेवल्या आहेत! तुझी इच्छा असली तर आतांच्या आतां आपण त्या तयारीला लागूं! तिथं कुणीच आपणाला ओळखणार नाहीं अशा दूरवरच्या एखाद्या बकाली शहरांत पळून जावूं! तिथं जाऊन आपण कांहीं तरी व्यापार धंदा करूं! नांवांत आणि रहाणींत बदल करून संसारांत

एकमेकांना सुखी करण्याचा प्रयत्न करूं! मजा करूं! आयुष्यांत कदापिही न उपभोगलेल्या सुखाचा आस्वाद घेऊं! मनाच्या स्मृतिगुहेंतून आपण गुरगुरणाऱ्या हिंसाश्वापदरूपी पूर्व कर्मांना हुसकावून लावूं! पण कार्मिन, मला हें प्रचंड धाडस करायला लावणारी एकच एक अचाट शक्ति आज भूतलावर नांदत आहे! ती शक्ति तुझ्यांत आज मला दिसते! कारण माझ्या दृष्टीनं तूं माझं आजच स्फूर्तिस्थान आहे! तुझ्याखेरीज मात्र माझे हे सगळे बेत व्यर्थ आहेत! आपणाला आज जी एकमेकांच्या सहाय्याची जरूरी आहे, ती आम्हांस पापाकडून पुण्याकडे नेण्यासाठींच बरं—"

"जुवांव, कार्मिन तुझ्या शब्दाबाहेर नाहीं! तूं सांगत असशील तर आपण याक्षणीं घरांतून निघून जावूं—"

"कार्मिन तूं किती चांगली आहेस!" जुवांवनं तिला आपल्या जवळ ओढीत म्हटलं.

तोंच हर्षानं वेडा झालेला रामू देवळी बाहेरून दाराला लावलेले कान हळूच बाजूला करून घाईघाईनं पावलं टाकीत कुठंतरी धापा टाकीत जाऊं लागला.

कांहीं वेळानं तो परत आला. त्याच्याबरोबर एक काब व एक सोल्दाद अशीं दोन पोलिसचीं माणसं होतीं. येतांच त्यांनीं जोरजोरानं कार्मिनच्या घराचं दार ठोठावयाला सुरवात केली. "त्यादिवशीं तूं मला पिटाळून लावलं त्याचं हें प्रायश्चित्त भोग!" असं आतां दार उघडतांच कार्मिनला आपण सूचित करूं असा रामू देवळी त्यावेळीं आपल्या मनाशीं बेत रचूं लागला.

बराच वेळ पोलिसांकडून दारावर धक्के बसत होते. पण आज अनाहुत संकटाला बिचकून गांगरून गेलेल्या त्या नवराबायकोनं बाहेर पोलिस आले आहेत हें कळतांच त्यांना दार उघडायचं सोडून आंतील बत्ती मात्र घालविली. आणि कसल्यातरी प्रासंगिक कानगोष्टी करण्यांत ते दोन लाचार जीव गढून गेले. त्यांना त्या दुःप्रसंगाची मुळींसुद्धां कल्पना नव्हती. आगींतून सुटून फोफाट्यांत पडल्यासारखी त्यांची स्थिति झाली. तरी बरं कीं, कार्मिनला त्या प्रसंगांतून निसटण्याची तितक्यांत एक तोड सुचली. तिनं जुवांवचा हात हळूच आपल्या हातीं घेतला आणि तिनं मागील दारचा दरवाजा आवाज न करितां हळूच उघडला.

तों काय ?

एक पोलीस तिथं उभा असलेला त्याला दिसला.

जुवांवनं परिस्थिति ओळखली.

मागील दारीं धूर्ततेनं अंधारांत दडून उभ्या राहिलेल्या सोल्दारानं कार्मिन दार उघडून बाहेर निघतांच कारण नसतांना तिचं डाव्या हाताचं मनगट घट्ट पकडलं. जुवांवची सहनशीलता लयास गेली. त्यानं जवळच असलेल्या कांहीं जळाऊ लाकडांतून एक मोठी काठी क्षणांत उचलून घेतली आणि ती अशा जोरानं कांहीं त्या सोल्दाराच्या डोक्यावर हाणली कीं दुसऱ्याच क्षणीं तो सोल्दार डोळ्यासमोर अंधेरी येऊन धाडकन जमिनीवर कोसळला. हें काम इतक्या जलद गतीनं झालं कीं, तिथं झालेली गडबड ऐकून पुढील दारांत उभा असलेला काब व रामू देवळी तिथं येऊन ठेपण्यापूर्वीच कार्मिन आणि जुवांव एकमेकांचे हात धरून शेजारची टेकडी चढूं लागलीसुद्धां.

तोंच काब आणि रामू देवळी तिथं येऊन दाखल झाले. सोल्दाराला मूर्च्छीत पडलेला पाहून तर त्या दोघांची बरीच घाबरगुंडी उडाली. लोकांना जमविण्यासाठीं रामू देवळ्यानं मोठमोठ्यानं आरडाओरड करायला सुरवात केली. काब मात्र टेकडीवरून पळून जाणाऱ्या माणसांचा पाठलाग करण्यासाठीं घाईघाईनं वर जाऊं लागला. तो मनांतून जरी भलताच घाबरलेला असला तरी त्याच्यावर पोलिसी संस्कार झालेले होते. आपण अशा स्थितींत गुन्हेगाराला पकडलं तर आणखी एकादं फित चढण्याची त्याला आशा होती. म्हणूनच पळणाऱ्याला पकडण्यासाठीं तो देहाची विशेष पर्वा न करितां धांवपळ करूं लागला.

जुवांव आणि कार्मिन आतां ती लहानगी टेकडी ओलांडून तिच्या पाठीमागें असलेला दुसरा एक मोठा डोंगर चढूं लागलीं होतीं.

त्या दोघांमागून काब पळत सुटला होता.

जुवांवला मात्र कार्मिनमुळें धांवताना बराच त्रास होत होता. नपेक्षां काबाच्या हातावर तुरी देणं कांहीं त्याला कठीण नव्हतं.

सरतेशेवटीं काबानं त्याचा पाठलाग केलाच.

जवळ येतांच स्वसंरक्षणापायीं बेतू काबावर तुटून पडला. दोघांची बराच वेळ झटापट झाली. जणूं काय दोघेही एकमेकाचे प्राण घेताहेत कीं काय अशी कार्मिनला त्यावेळीं दाट शंका आली. ती तर अगदीं घाबरून गेली होती. तिच्या हातापायांना कांपरं भरलं होतं. छाती वर खालीं होत होती. त्या दोघांनीं एकमेकाला सोडावं म्हणून तिनं प्रयत्नाची शिकस्त केली. आणि त्याला यश येत नाहीं असं पाहून ती एकदोनवेळां किंचाळलीसुद्धां. शेवटीं तिनंही बचावाचं धोरण स्विकारलं. जवळचा एक

मोठा दगड उचलून मोठ्या युक्तीनं तिनं तो त्या काबाच्या डोक्यावर फेकला आणि क्षणांत त्या झटापटींतून जुवांवची अचानक सुटका झाली. त्यानं अंगांत घातलेल्या कफनीच्या फाटून चिंध्या झाल्या होत्या. भुईवरून उठतांच त्यानं प्रथम आपल्या नोटा सुरक्षित आहे कीं नाहीं हें पाहिलं आणि त्यानं एक समाधानाचा निःश्वास सोडला. दुसऱ्याच क्षणीं त्यानं कार्मिनचा हात पूर्ववत् आपल्या हातीं घेतला व तो म्हणाला–" चल ! लवकर पाय उचल ! लोक इथं आमचा शोध करीत येण्यापूर्वींच आपणाला ही समोरची गर्द झाडी ओलांडली पाहिजे! नपेक्षां आपली आतां धडगत नाहीं—"

इतकं बोलून तीं दोघं मिळेल त्या आडवाटेनं पळत सुटलीं.

खालीं रामू देवळी लोकांना जमविण्यासाठीं अजूनही बोंबाबोंब करीत होता.

लोक हातीं पेटत्या चुड्या व कंदील घेऊन हळुहळू जमा होत होते.

---

# काळूचा हृदयस्पर्शी अंत !

## २१

तें जंगल नव्हतं. शहराकडे तोंड करून उभी असलेली ती डोंगर टेकडी गर्द झाडांझुडपांनीं खच्चून भरली होती इतकंच ! तिथं हिंस्त्रश्वापदांना बिलकूल स्थान नव्हतं. फक्त साप व जिवाणूं यांच्या दाट अस्तित्वाचीच काय ती त्या ठिकाणीं नजर टाकणाऱ्याला जाणिव होत होती. अंधारामुळें तेथिल वातावरण एकंदरींत भीतिदायक आणि मनाला धक्के देणारं होतं. कार्मिनचा डावा हात जुवांननं आपल्या उजव्या हातीं घट्ट पकडून ठेवला होता. अडखळत, ठेंचा खात तीं त्या रानमाळावरून पळत सुटली होतीं.

मधूनच एकाद्या विशिष्ट ठिकाणीं जमिनीवरील पाचोळ्यांतून सळसळ असा आवाज होई आणि तितक्यांत भयानं गांगरलेली कार्मिन हलकेंच

किंचाळे व क्षणांत जुवांवच्या गळ्याला घट्ट मिठी मारून त्याला कांहीं वेळ बिलगून उभी राही. तो तिची समजूत घाली. लगेच तीं दोघं पुढें निघून जात.

अशा रीतीनं तीं कांहीं पुढं गेलीं न गेलीं तोंच मागं कसला तरी आवाज झाल्यानं तीं दोघं वळून पहातात, तों कुणि तरी एक जनावर आपल्यामागून धांवत येत असल्याचं अस्पष्ट असं त्यांना दिसलं. 'तें काय!' कार्मिननं भीतभीत जुवांवला विचारलं. तोही अतोनात घाबरला. त्यानं कार्मिनला चटकन आपल्याजवळ ओढलं. तिचे हात तितक्यांत त्याच्या छातीला भिडले. जुवांवचं काळीज खालीवर होत होतं.

"कुत्रा तर नाहीं तुझा तो?" संशय घेऊन कार्मिननं जुवांवला प्रश्न केला.

एकाएकीं जुवांवच्या धडधडणाऱ्या छातीचें प्रमाण बरंचसं कमी झालं. त्या प्रश्नानं त्याचं समाधान झालेलं दिसलं. तोंच तें जनावर शेंपटी हालवीत त्यांच्याजवळ येऊन टेपलंसुद्धां. तो काळू कुत्रा होता. येतांच जुवांवनं त्याला वर उचलून घेतलं. त्याला कुरवाळलं. आपला गाल नेऊन त्याच्या तोंडाला भिडविला. काळूही त्याच्याशीं भलतीच लगट करूं लागला. आपल्या गळ्यांतील पट्टयाला अडकविलेल्या सांखळे-सह काळू त्या ठिकाणीं आला होता. ती सांखळ का कोण जाणे जुवांवनं तितक्यांत हळूच काढून घेतली व आपल्या कफनीच्या खिशांत टाकून दिली. काळूवर त्याचं किती प्रेम होतं! तो जरा कुठं डोळ्याआड झाला तर त्याला चैन पडत नसे. पणजीहून फरारी झाल्यावर आपल्याशीं प्रामाणिक दोस्ती करणारा खरा जिव्हाळ्याचा मित्र त्याला जर त्याप्रसंगीं

कोण लाभला असेल तर तो काळू! इंग्रजींतील एका खेड्यांत ज्या दुर्दैवी घटनेमुळं काळूचा आणि त्याचा संबंध घडला तो प्रसंगच किती अविस्मरणीय होता! काळू हा त्या खेड्यांतील एका धनगरानं पाळलेल्या काळ्या रंगाचा आणि ठेंगू जातीपैकीं एक होता. जुवांव साधूवेषांत ज्या दिवशीं त्या खेड्यांत पहिल्यांदाच गेला तेव्हां काळूच्या धन्याला मरून अवघे दोन दिवस झाले होते. त्यामुळें सत्तेच्या अन्नाला काळू मुकला होता आणि गांवांतील लोकांनीं उष्टं म्हणून टाकलेल्या अन्नावर जगण्याची त्याच्यावर पाळी आली होती. जुवांवनं काळूला जेव्हां प्रथम पाहिलं, तेव्हां त्या खेड्यांतील डोंगर-पठारावर जळून राख झालेल्या एका चितेशेजारीं काळू मुकाट्यानें बसलेला होता. ती चिता दोन दिवसापूर्वीं वारलेल्या काळूच्या धन्याची होती. कां कोण जाणे जुवांवला त्या कुत्र्याबद्दल आदर वाटूं लागला. एकदोन दिवसांतच जुवांवनं त्या कुत्र्याशीं आपण होऊन मैत्री संपादण्यास सुरवात केली आणि तेथिल आपल्या थोड्याच दिवसांच्या मुक्कामांत काळूला वश करून घेण्यांत त्याला कल्पनातीत यश आलं. त्या मुक्या जनावराला दुसरा धनी मिळाला.

अशा रीतीनं काळू आणि जुवांव एकमेकांशीं निगडीत झाले होते. त्यानंतर काळूला बरोबर घेऊन जुवांवनं महेश्वरीबुवा या हातावर गोंदलेल्या नांवानिशीं गोव्यांत प्रवेश केला होता. मुकेपणाचं सोंग पत्करल्यानें आपला परिचय हातावर गोंदलेल्या त्या नांवानेंच तो लोकांना करून देत होता. त्यामुळें नात्याच्या माणसांना सर्वस्वीं आंचवलेल्या जुवांवला काळू हा जणुं आपल्या पोटच्या पोरासारखा वाटूं लागला.

एकत्र बसून जेवावं, एकत्र फिरावं, एकत्र झोंपावं, इतकी त्या दोघांची एकमेकांवर भक्ति! इतकं सचोटीचं आणि निर्भेळ प्रेम माणसाला माणसावरही करतां येत नसेल—

थोड्या वेळापूर्वी ओढवलेल्या आपत्तींतून कार्मिनच्या नी आपल्या बचावाचं धोरण स्विकारतांना काळूसारख्या सवंगड्याकडे आपलं कसं-काय दुर्लक्ष झालं, याचंच जुवांवला आतां राहून राहून आश्चर्य वाटत होतं. इतकंच नव्हे तर स्वार्थापायीं लाचार बनून आपण येतांना काळूला बरोबर न घेतां खालींच सोडून आलों याबद्दलही त्याला आतां अतोनात दुःख झालं. नकळत कां होईना पण काळूच्या बाबतींत घडलेला तो अपराध सामान्य नव्हता याचा त्याला प्रत्यय आला. स्वतःच्या क्रूर-पणाची त्याला लाज वाटली. काळू तितक्यांत आपल्या समयसूचकतेनं वासाच्या आधारावर आपला पाठलाग करीत आला नसता तर कदाचित त्याची आणि आपली ही अखेरचीच भेट होती, ही कल्पना येऊन त्याच्या भावनावश अंतःकरणाला क्षणभर पीळ पडला.

—आणि त्याचवेळीं हातीं पेटत्या चुड्या, कंदील व बॅटरीचे दिवे घेतलेलीं कांहीं माणसं आपल्याच बाजूनें येत असल्याचं दृश्य त्याच्या व कार्मिनच्या नजरेस पडून त्या दोघांची अतीशय तारांबळ उडाली—

जुवांवनं वर उचललेल्या काळू कुत्र्याला तत्काळ खालीं ठेवलं. तोंच काळूची दृष्टी त्या मागून येणाऱ्या लोकांकडे गेली आणि तो जोरजोरानं भुंकू लागला. काय दैवयोग तरी पहा! काळूला भुंक-ण्याची तितक्यांत लहर न येती तर जुवांव आणि कार्मिन नक्की कुठं

पळाली याचा अंदाज घेणं त्या मागील लोकांना बरंच कठीण गेलं असतं. पण आतां काय झालं तर काळूच्या भुंकण्याच्या दिशेनं वाट काढण्यांत त्या लोकांना अनायासेंच मदत झाली. ते मोठमोठ्यानें गिल्ला करीत त्या दिशेनें पुढें पुढें सरकूं लागले. पळापळ सुरू झाली. जुवांव नि कार्मिन पुढें व मागून ते लोक असें दृश्य तितक्यांत दिसूं लागलं. प्रतिकारार्थ पळतां पळतां काळू मोठमोठ्यानं आपल्या भुंकण्याची तोफ त्या लोकांवर डागू लागला. तेवढ्यानें कांहीं लोक भिऊन मार्गेमार्गेच राहूं लागले. तर कांहीं धीर करून पळणाऱ्यांचा पाठलाग करीतच सुटले. "पकडा! पकडा!" अशा त्यांच्या गर्जना त्यावेळीं सुरू होत्या.

अंधारामुळें पाठलाग करणाऱ्यांना पळणारीं माणसं दिसत नव्हतीं. पण पाठलाग करणाऱ्यांना मात्र पळणाऱ्यांच्या दृष्टींतून निसटणं शक्य नव्हतं. कारण मागून येणाऱ्यांचे देह उजेडामुळें मुळीं लपूंच शकत नव्हते. फक्त कुत्र्याच्या भुंकण्यावरूनच काय ती पळणाऱ्यांना पकडण्याची आस पाठलाग करणाऱ्यांनीं मनाशीं धरली होती इतकंच.

काळू कुत्रा अजून भुंकतच होता. त्याची भेदरलेली दृष्टि त्या मागून येणाऱ्या जमावाकडे लागली होती. परिस्थिति बिकट आहे एवढं जुवांवनं ओळखलं, एकमेकाचा हात धरून तीं दोघं अद्यापिही न थांबतां सारखीं पळत होतीं. काळू आतां आपणाला सोडून कुठंच जाणं शक्य नाहीं, तो आपल्या मागून येतो आहे या विश्वासानं पळतांना क्षणभर थांबून मागं पहाण्याचंसुद्धां त्यांनीं टाळलं. पण त्यामुळें बिचाऱ्या काळूवर मात्र भलतीच आपत्ती कोसळली! त्याला वाटलं मागून येणाऱ्या मंडळींना आपण चांगलाच धडा शिकवूं. म्हणून तो जुवांवच्या नि कार्मिनच्या

मागें पळायचं सोडून बिथरलेल्या स्थितींत मागून येणाऱ्या त्या लोकांचाच पाठलाग करीत सुटला. त्याचं भुंकणं एकसारखं चालूच होतं.

काळू त्या जमावावर एकाएकीं तुटून पडला.

लोकांची पांगापांग झाली. बोंबाबोंब, धांवपळ वगैरे गोष्टींना ऊत आला.

तोंच एकाएकीं पिस्तुलांतून कुणितरी गोळी झाडल्याचा प्रचंड आवाज वातावरणांत घुमून इतका वेळ चालू असलेलं कुत्र्याचं भुंकणंहि त्याचवेळीं अचानक बंद झालं—

"ऐकलंस ? आवाज कसला झाला तो ? बंदुकीचा का ? आणि काळू कुठें गेला ?" इतकं बोलून कार्मिन "काळू ! काळू !!" म्हणून ओरडूं लागली.

पटकन् जुवांवनं तिच्या तोंडावर हात धरला. क्षणभर शून्य दृष्टीनं उगीचच आसपास पाहिल्यासारखं केलं. त्याच्या डोक्यांत लख्खन प्रकाश पडला. काळू ! नाहीं ! तो आज त्याचा राहिला नव्हता—



# आतां पुढें ?

## २२

जुवांव आणि कार्मिन आतां भलतींच दमलीं होतीं. त्यांच्यांत चालण्याचं देखील फारसं त्राण राहिलं नव्हतं. एकदांची ती डोंगर टेकडी सोडून कुठून तरी आपणास शहराचा आसरा घेतां येत असल्यास पहावा म्हणून त्या दोघांची सारखी धडपड चालली होती. पण पोलीस काय दुधखुळे होते ? अंधारांत गुन्हेगारांचा तलास लागत नसलेला पाहून ते त्या रात्रीं आपल्या मदतीला आलेल्या लोकांसह ती डोंगर टेकडी सोडून निराशेनें माघारी परतले होते. तद्नंतर त्या डोंगराच्या सभोंवतालीं—ज्या ज्या दिशेनं गुन्हेगारांना पळून जाणं शक्य होतं त्या त्या दिशेनें पोलिसांनीं येऊन सशस्त्र पहारा करावयास लागलीच सुरवात केली होती. उजाडतांच पुन्हां डोंगरपठारावर शिरून

गुन्हेगारांना बंदिस्त करायचं हा त्यांचा तसं करण्यांतील व्यावहारीक दृष्टिकोण असावा.

त्यामुळें डोंगरपठारावर लाचार स्थितींत अडकून पडलेल्या बिचाऱ्या जुवांव–कार्मिनला ती रात्र अतिशय कठीण परिस्थितींत घालवावी लागली. ज्या ज्या वाटेनं त्यांनीं निसटण्याचा प्रयत्न करावा त्या त्या ठिकाणीं पोलीस पहाऱ्यावर असल्याचा अनुभव येऊन त्यांचा कोंडमारा व्हायचा. त्यांनीं परिस्थिति ओळखली. दोघांचाही थरकांप होऊन गेला. आणि कां नाहीं होणार? स्वप्नाहूनही अद्भूत! छिन्नविछिन्न झालेल्या प्रेताहूनही अधिक भयप्रद! नखावर कोरलेल्या ताजमहालाहूनही विस्मयकारक! अशा अतिरंजीत नि भडक वातावरणाचा स्वानुभवजन्य आस्वाद घेण्याची कटु आपत्ति त्यांच्यासमोर एखाद्या भूतपिशाच्चाप्रमाणें 'आ' वासून उभी होती. त्यांनीं तरी किती वेळ धीर धरावा?

"जुवांव नाहीं माझ्यानें रहावत इथं आतां! काय करूं मी! मला झोंप येतेय! तहानेमुळें घसा तर अगदीं कोरडा पडला आहे—" कार्मिन एकाएकीं जुवांवच्या गळ्याला मिठी मारून म्हणाली.

"आपण असं करू या?"

"काय?"

"मी या झाडाला पाठ टेकून बसतो. तूं माझ्या मांडीवर मान टाकून निज. जराशानं उजाडलं कीं येथून आपण पळ काढूं—"

"बरं तसं करूं!" असं म्हणून कार्मिन त्यानं सांगितल्याप्रमाणें त्याच्या मांडीवर डोकं टेकून निजली.

कांहीं वेळ तिला त्रास झाला. जमिन ओबडधोबड आणि दगड धोंड्यानें दाटलेली असल्यानें प्रयत्न करूनही तिला झोंप येईना. पण त्या स्थितींत तिला फार वेळ रहावं लागलं नाहीं. कारण झोंपेच्या धुंदीनं तिच्यावर त्यावेळीं इतकी मात केली होती कीं, अर्ध्या पाऊण तासांतच तिचा डोळा लागला.

जुवांवलाही मधून मधून डुलकी येत होती. पण निजायचा धीर कांहीं त्याला होईना. डोळे उघडे ठेवून तो बसला होता. स्वत:पेक्षां त्याला कार्मिनचीच त्यावेळीं अधिक दया आली. कार्मिन आज भलत्याच संकटांत सांपडायला आपणच खरे कारण आहों असं त्याला वाटलं. त्यानं हळूच तिच्या केंसावरून हात फिरविला. क्षणांत आकाशाकडे दृष्टि लावली. एक दीर्घ निःश्वास टाकला.

आसपासचीं झाडं हलून सळसळ असा आवाज निघत होता. मधून मधून एखादा पक्षी गळ्यांतून विचित्र असा आलाप काढून वातावरणाच्या निरूप भयानकतेंत वाढती भर घालीत होता. आकाश पूर्वीसारखंच काळ्याकुट्ट अंत:करणानं जगाकडे पहात होतं. जवळच्या वेळेवर दर्या विकट हास्य करून खिदळत होता.

जुवांव बसल्या ठिकाणींच घोरूं लागला.

अकस्मात त्याला एक स्वप्न पडलं.

स्वप्नांत त्याला त्या डोंगरपठारावर एकटंच सोडून कार्मिन पळून गेली होती. 'कार्मिन! कार्मिन!!' अशी तिच्या नांवानं ओरड करीत एखाद्या वेडसरासारखा जुवांव मिळेल त्या वाटेनं पळत सुटला होता. एकदां ठेंच

लागून तो जमिनीवर कलंडला. दगडाला डोकं आपटून त्याच्या कपाळाला एक मोठी जखम झाली. तिच्यांतून रक्तस्राव सुरू झाला. दोन्ही हातानीं त्यानं ती जखम तत्काळ घट्ट दाबून धरली. तो विव्हळूं लागला.

एकाएकीं कार्मिनची झोंपमोड झाली. जुवांवचं स्वप्न व त्यामुळें त्याचं चालू असलेलं विव्हळणं तिला आतां स्पष्ट ऐकूं येत होतं. ती चटकन् उठून बसली. तिनं जुवांवला क्षणांत हालवून जागं केलं.

" कोण ?...कार्मिन !....काय ?..." जुवांव अर्धवट झोंपेंतच विचारूं लागला.

" जुवांव, असं काय करतोस तूं ? जागा हो ! भीति वाटली तुला ? का स्वप्न पडलं ? उघड पाहूं नीट डोळे ! "

" काय झालं ? "

" नाहीं, म्हटलं तुला स्वप्न पडलं का ? "

" स्वप्न ? होय कार्मिन ! किती भयंकर !–" इतकं बोलून आपणाला पडलेलं स्वप्न त्यानं तिला सांगितलं.

ती हंसली.

जुवांवनं तिला हळुच जवळ ओढलं. तिच्या गालावरून हात फिरविला. आणि साशंक बनून त्यानं विचारलं–" माझें हें स्वप्न खरं तर ठरणार नाहीं ?"

" तुला तसा संशय आला का ?"

" संशय ? छे ! पण वाटलं खरं तसं—"

" वेड तर लागलं नाहीं तुला ? तुला मी सोडून जाईन, आणि या स्थितींत ? नाहीं जुवांव ! तें शक्य नाहीं—"

“नाहीं ना ? विश्वास ठेवूं ना तुझ्यावर ? कदाचित तूं तसा अविचार केलास तर मात्र मला जगणं देखिल अशक्य होईल! झुरून झुरून मी कुठंतरी मरून जाईन—”

“उगाच घाबरतोस तूं! एकमेकांना धीर देऊनच आपणाला यापुढं जगांत जगायचं आहे! कारण आपण दोघंही गुन्हेगार आहोंत! आपला गुन्हा हेंच आपल्या जीवनाला चिकटलेलं गालबोट आहे! आपणाला यापुढं जगायचं असेल तर हें गालबोट दुसऱ्याच्या नजरेस न पडण्याची आपणाला दक्षता घेतली पाहिजे, नाहीं का ?”

“कार्मिन, तूं किती शहाणी आहेस!”

“जुवांव—”

“काय ?”

“किती वाजले असतील आतां ?”

—आणि त्याचवेळीं खालीं कुठंतरी कोंबड्यानं ‘कोंऽकों ऽऽ कों ऽऽऽ’ अशी साद घातली—

“ऐकलंस ?” जुवांवनं कार्मिनला विचारलं.

“होय.”

“पहांट झाली!”

“चल ऊठ! याच पावलीं आपण कुठंतरी जाऊं या! तसं न केलं तर जराशानं आपण आयतेच पोलिसांच्या हातीं पडूं! डोंगराच्या दोन्हीही बाजूला असलेल्या रस्त्यावर पोलिस कसे बसून आहेत हें रात्रीं आपण पाहिलंच ना ? ते बहुतेक उजाडण्याचीच वाट पहात असावेत! जराशानं ते आम्हाला हुडकण्यासाठीं या सबंध डोंगर पठारावर थैमान

घालतील ! उजेडामुळें आमचा तलास लावणं त्यांना बिलकूल कठीण जाणार नाहीं ! शक्य झालं तर त्यापूर्वींच आपण इथून काढता पाय घेतला पाहिजे ! तुला नाहीं असं वाटत ? "

" मला पटतं तुझं म्हणणं ? पण पोलिसांचा डोळा चुकवून या डोंगरपठारावरून कसं निसटावं ही युक्ति कांहीं मला सूचत नाहीं ! शिवाय इकडच्या वाटाही माझ्या परिचयाच्या नाहींत—"

" त्याची नको तुला काळजी ! मला इकडच्या सगळ्या वाटा माहित आहेत ! तशांत आतां साधारणसं दिसूंही लागलं आहे ! आतां वेळ काढूं नकोस ! माझ्यामागून चल ! पाहूं या आपणाला पोलिसांचा डोळा चुकवून निसटतां येईल तर—"

तीं तशींच चालूं लागलीं.

रात्रौ याच दिशेनं तीं दोघं आलीं होतीं.

कांहीं पुढं गेल्यावर तीं एकाएकीं दचकलीं.

रात्रौ मरून पडलेला काळू कुत्रा त्यांना आतां तिथं दिसला. त्यांच्या हृदयांत कालवाकालव सुरू झाली. दोघांच्याही डोळ्यांत क्षणांत अश्रू उभे राहिले. धावत जाऊन जुवांवनं मृत काळूच्या जवळपास आपले दोन्हीही गुडगे टेकले. काळूच्या मानेंत पिस्तुलाची गोळी शिरून त्याच्या शरीराचा कांहीं भाग रक्तानें न्हाला होता. जुवांवला कससंच वाटलं. तो शून्य दृष्टीनं मृत काळूकडे पहातच सुटला. त्याच्यामागें कार्मिन उभी होती. तिनं आपले पुढें आलेले केंस मागें नेऊन त्यावर उजव्या हाताचा पंजा ठेवला होता. दृष्टि काळूवर रोंखली होती.

वारा वहात नव्हता. झाडं निस्तब्ध होतीं. पक्षी पंखांत मान घालून बसले होते. वातावरण कसं अगदीं गंभीर दिसत होतं........

त्याचवेळीं जुवांवनं वर मान करून कार्मिनकडे पाहिलं. तिनंहि त्याच्या नजरेला नजर भिडविली.

"...आतां पुढें?..." त्यांनीं एकमेकांना न विचारलेला हा प्रश्न त्या दोघांच्याही जिभेवर तितक्यांत नाचूं लागला. पण—



## माझं नांव देद्रू

### २३

कशीबशीं तीं दोघं एकदांची एका आडवाटेंतून खालीं तर आलीं. जवळपास चिटपाखरूं देखील फिरकतांना कुठं दिसत नव्हतं. कुणि आपणाकडे पहात तर नाहीं ना या शंकेनं पुन्हा पुन्हा सभोंवतालीं दृष्टि फिरवून तीं दोघं खात्री करून घेत होतीं. कांहीं वेळानें त्यांना दुसरी उतरण लागली. ती वाट ताळगांवला जात होती. कार्मिनचा उजवा हात आपल्या डाव्या हातीं घेऊन जुवांव तिच्यासकट ती उतरण उतरूं लागला.

पायथ्याशीं येतांच त्यांना एक चुडतांची झोंपडी लागली. त्या झोंपडीबाहेर एक म्हातारा गावडा लाकडं फोडीत होता. जुवाव व

कार्मिन दृष्टीस पडतांच त्यानं हातांतील काम तत्काळ बंद केलं आणि कांहींशा आश्चर्यानें तो त्या दोघांकडे पहातच सुटला.

जुवांवनं कां कोण जाणे त्याला तत्काळ जवळ बोलावून घेतलं. त्याच्या त्या झोंपडींत त्याच्याखेरीज दुसरं कुणि आहे किंवा काय याविषयीं चौकशी केली. त्यावेळीं तो म्हातारा गावडा म्हणाला " मी एकटाच रहातों येथें ! मला दुसरं कुणि नाहीं—"

" नांव काय तुमचं ? "

" माझं नांव देटू "

" बरं तुम्हाला थोडा वेळ आहे का ?

" का ? "

" काम आहे माझं थोडसं. "

" माझ्याशीं ? आणि तुमचं काम ? "

" असे बिचकून जावूं नका म्हातारे बुवा. मी सगळं कांहीं तुम्हांला सांगतो. पण त्यापूर्वीं आपण सर्वजण मिळून तुमच्या या झोंपडीच्या आंत जाऊन बसायला आपली कांहीं हरकत आहे का ? "

" बिलकूल नाहीं. चला–" असं म्हणून तो त्यांना घेऊन झोंपडींत गेला.

आंत जातांच म्हाताऱ्यानं त्यांना बसण्यासाठीं जमिनीवर एक फाटका तूटका गोणपाट अंथरला.

जुवांव म्हणाला—" कांहीं जरूर नव्हती या गोणपाटाची. बसलों असतों अशींच जमिनीवर. "

"बसा हो! घरांत दुसरं कांहीं नाहीं तुम्हाला बसायला द्यायला म्हणून हा गोणपाट दिला—"

लागलींच तीं त्या गोणपाटावर बसलीं.

म्हाताराही जवळच ओणव्यानं बसून प्रश्नार्थक चर्येनं त्या उभयतां-कडे पाहूं लागला.

जुवांवनं हळुहळू एकेक गोष्ट सांगायला सुरवात केली. म्हातारा त्याला एकंदरींत दयाळू स्वभावाचा दिसला. जराशानं त्यानं आपली सारी कर्मकथा त्याला सुनविली. मदतीच्या आशेनं त्याच्याकडे पाहिलं.

म्हातारा क्षणभर आपल्याशींच विचार करायला लागला. त्या मुदतींत त्यानं नाहींतरी दोनदां कार्मिनकडे दयाशील दृष्टीनं पाहिलं. त्यांनीं निवेदन केलेला एकंदर वृत्तांत एकाद्या नाटकांतील पात्रांनीं रंगभूमीवर वर्णन केलेल्या आत्मकथनपर माहितीसारखा त्याला वाटला. पण त्यांत बुद्धीला विशेष ताण देण्यासारखा कांहीं कल्पित नि असत्य भाग असेल याबद्दल शंका घेण्यास मात्र त्याचं मन बिलकूल तयार होईना. कारण त्या अपरिचित जोडप्याच्या वार्णींत नि हालचालींत नाटक्याचा नाटकीपणा नव्हता हें त्यानें सहजासहजीं पारखलं होतं. त्यामुळें त्यांना त्या परिस्थितींत मदत करायला त्याची मुळींच हरकत नव्हती. पण ज्या मार्गानं त्यांना आपण मदत करायची तो मार्ग म्हाताऱ्याला अद्यापि उपलब्ध झाला नव्हता. म्हणून त्यानें प्रथम जुवांवकडे त्यासंबंधीं स्पष्टपणें चौकशी केली.

तेव्हां जुवांव त्याला म्हणाला—"आपली हरकत नसल्यास आजचा सबंध दिवस तुमच्या झोपडींत लपून छपून वास्तव्य करण्याचा आमचा विचार आहे. ही एवढी अडचण निभावली कीं, उद्यां पहांटेच्या

वाफोरांतून आम्हीं मुरगांवला निघून जाणार आहोंत. त्यापूर्वी आम्हांला आणखी एका बाबतींत तुमची मदत पाहिजे आहे. ती म्हणजे पणजीला जाऊन संध्याकाळपर्यंत आमच्यासाठीं थोडेबहूत कपडे विकत घेऊन येण्याची. त्यासाठीं लागणारे पैसे मी तुमच्या स्वाधीन करीनच. हे कपडे आम्हांला वेषांतर करण्यासाठीं हवे आहेत. चालू वेषांत तर यापुढं बाहेर पाऊल टाकण्याची कांहीं सोय नाहीं! म्हणूनच तर हा वेषांतराचा नवीन उपद्व्याप केला पाहिजे—"

"आलं ध्यानांत. बरं मी असं विचारतों, मुरगांवला पळून जाण्यांत तुमचा हेतु काय आहे?"

"हेतु इतकाच कीं, तिथं जाऊन आम्हांला आगगाडींतून इंग्रजींत पलायन करायचं आहे—"

"अस्सं होय? मग तुम्हीं आतां सांगितली एवढीच माझ्याकडून तुम्हांला या प्रसंगांत मदत पाहिजे तर?"

"हो. त्याबद्दलचे आपले श्रम अर्थातच फुकट जाणार नाहींत–"

"तें जाऊं द्या हो! माझ्या कवडीमोल श्रमाची नका तुम्हीं पर्वा करूं! मी जन्माचाच भिकारी आहे! माझ्याकडून होईल ती मदत मी तुम्हांला करीनच–"

हां हां म्हणतां दिवस कसाबसा निघून गेला.

दुसरे दिवशीं पहांटे ४–४॥ च्या दरम्यान झोंपडी सोडून जुवांव, कार्मिन व तो म्हातारा गावडा एवढी मंडळी पणजीला वाफोराच्या धक्क्यावर येऊन थडकली.

काळोख मी म्हणत होता. नदींत होड्या आणि फतेमाऱ्या नांगरून पडल्या होत्या. रस्तोरस्तीं दिवे तेवत होते.

जुवांव व कार्मिन यांनीं त्यावेळीं हिंदुपद्धतीनं पोषाक केला होता. एकंदरींत ती वेषांतराची पद्धत त्यांना चांगली साधली होती. तिकीट काढून वाफोरांत जाऊन बसण्यापूर्वी सोबतच्या त्या गावड्याला जुवांव एका कडेला घेऊन गेला. त्यानं प्रथम मदतीबद्दल त्याचे आभार मानले. या कानांतली गोष्ट त्या कानांत जायला देऊं नका म्हणून त्याला विनविलं. हळूच खिशांतील कांहीं नोटा काढून त्याच्या हातांवर ठेवल्या. म्हातारा ते रुपये घेतांना कां कूं करीतच होता. पण जुवांवनं त्याला पुन्हा पुन्हा विनवून सांगितल्यावर त्याला ती रक्कम नाईलाजानं स्विकारावी लागलीच.

आणि तितक्यांत ते एकमेकांचा निरोप घेऊन मोकळे झाले.

जुवांव आणि कार्मिन वाफोरांत जाऊन बसलीं.

धक्का सोडून वाफोर निघेपर्यंत तो म्हातारा गावडा बाहेरच उभा होता.

कांहीं वेळांत वाफोर मुरगांव बंदराकडे तोंड करून निघाला.

नदीचं निरूंद पात्र मागें टाकून बाहेरच्या विस्तृत समुद्रांत पदार्पण करतांच वाफोर हेलकावे खाऊं लागला.

त्या तशा स्थितींतच प्रथम दोनापावलचं बंदर घेऊन नंतर वाफोर मुरगांव बंदराकडे वळला.

त्यावेळीं भलतंच चांगलं उजाडलं होतं.

बंदरांत मोठमोठ्या परदेशांतून आलेल्या मालाच्या बोटी समुद्रांत नांगरून पडल्या होत्या. धक्याच्या रांगेनं माल ठेवण्यासाठीं मोठमोठ्या गोद्या बांधलेल्या होत्या; त्यांच्या आंत व बाहेर निरनिराळ्या धान्यानं भरलेल्या गोणींचे ढीगच्या ढीग पडले होते. चिमण्या व कबुतरें यांची भिरींच्या भिरीं त्या गोद्याच्या जवळपास बागडतांना दिसत होतीं. जवळच रेल्वे स्टेशन होतं.

पणजीकडून आलेला वाफोर धक्क्याच्या शिडीला येऊन लागतांच उतारू भराभर वर जाऊं लागले. जुवांव व कार्मिनही रीतसर वर गेलीं. तिथं एक काब व एक सोल्दार अशीं दोन पोलिसचीं माणसं उभीं होतीं. यांच्याकडे दृष्टि जातांच जुवांवचं काळीज एकाएकीं धडधडूं लागलं. त्याला वाटलं कार्मिनला व आपणाला पकडण्यासाठींच तर हे पोलिस लोक इथं उभे नाहींत? पण छे! तो संशय अगदीं चुकीचा होता अशीच जुवांवची कांहीं वेळानं खात्री झाली.

तो तसाच कार्मिनसह घाईघाईनं पुढें गेला. सकाळची मेलगाडी प्रवाशाची वाट पहात स्टेशनांत उभी होती. तिथं येऊन जुवांवनं बंगळूरचं तिकीट घेतलं. जवळच एक चहाचं दुकान होतं. आंत जाऊन त्या दोघांनीं प्रथम चहा घेतला. नंतर तीं स्टेशनांत शिरलीं. गाडींत जाऊन बसलीं. अजून पंधरा मिनिटं होतीं गाडी सुटायला—

———

*

# जकातीच्या नाक्यावर—

## २४

एकेक स्टेशन मागें टाकून गाडी पुढेंपुढें जात होती. वास्को, दाभोळी, कांसावली व माजोर्डा हीं छोटीं स्टेशनं घेऊन गाडी आतां मडगांवकडे तोंड करून जात होती.

आयुष्यांत कार्मिन आज पहिल्यांदाच आगगाडींत बसत होती. त्यामुळं धांवत्या डब्यांच्या दोन्हीही बाजूचं सृष्टिसौंदर्य डोळ्यांखालून घालण्यांत ती अगदींच तन्मय होऊन गेली होती. तिला लागूनच जुवांव बसला होता. आणखीही ५।१० माणसें त्या डब्यांत होतीं.

गाडी मडगांव स्टेशनांत शिरली त्यावेळीं जुवांव व कार्मिन खेरीज करून त्या डब्यांतील एकूणएक उतारू खालीं उतरण्यासाठीं दरवाजापाशी जाऊन गोळा झाले. तोंच गाडी स्टेशनांत थांबलीसुद्धां.

क्षणांत कांहीं लोक खालीं उतरले. कांहीं वर चढले. जुवांव व कार्मिन बसलीं होतीं त्या डब्यांत मात्र त्यावेळीं कुणिच चढलें नाहीं. जराशानं गाडीं स्टेशन सोडून पूर्ववत चालू लागली.

जुवांव डब्याबाहेर मान काढून उभा होता.

कार्मिन एका बांकड्यावर बसली होती. तिनं हळूच जुवांवला हांक घातली. त्याला जवळ येऊन बसायला सांगितलं. तो बसला. ती विचारूं लागली—"जुवाव, किती दूर जायचं आहे आपणाला आतां ?"

"—फार दूर ! जिथं आपल्या ओळखीचं एकही माणूस सांपडणार नाहीं अशा ठिकाणीं—"

"...जुवांव...!!"

"....काय कार्मिन ?...."

"....आपली परिस्थिति...."

"....नको ते विचार आतां....!"

"....आपण कुठं जायचं म्हणालास....?"

"....बंगलूरला...."

"....काय करायचं तिथं जाऊन....?"

"....एकमेकांना सुखी करण्याचा प्रयत्न करायचा....आयुष्याला निराळीच दिशा लावून द्यायची....हातून घडलेल्या पापकर्मावर विस्मृतीचा पडदा टाकायचा...."

....बिचारे जीव....!!

दुधसागराच्या धबधब्याला वळसा घालून गाडी आतां डोंगराचा चढउतार चढत वळणावळणानें चालली होती. प्रवाशांच्या दृष्टिपर्यातून सहजासहजीं न निसटणारा सौंदर्यसंपन्न गोमंतक—सुंदरीच्या गळ्यांतील तो मौलीक अलंकार कुणाही रसिकाच्या चित्ताला भुरळ पाडणारा होता. गाडींतील बहुतेक प्रवासी मंडळी डब्याबाहेर उत्सुकतेनं माना काढून तो देखावा आत्मसात करीत होती.

जवळच्या एका डोंगरपठारावरून दुधाळ रंगाच्या पाण्याचे लहानमोठे लोट खालीं वहात होते. त्यांच्याकडे स्नेहांकित दृष्टीनं पहाणारी नजीकची ती हिरवीगार वनश्री तत्क्षणीं आपआपसांत कांहींतरी कुजबुजत होती.

तो देखावा कमी सुंदर नव्हता. पण जुवांव—कार्मिनला त्याचं काय?

तीं दोघं आपल्याच विचारांत दंग होतीं.

जुवांवला तर कधीं एकदांचं कॅसलरॉक स्टेशन येतं आणि आपण इंग्रजींत जाऊन पडतों असं झालं होतं.

कांहीं वेळानं जसजसं हें स्टेशन जवळ येऊं लागलं तसतसं आपलं सामानसुमान गाडींतील उतारू जवळ करूं लागले. त्याचं कारण या स्टेशनवर गोव्याकडून रेल्वेमार्गें आलेल्या प्रवाशांकडून ब्रिटिश सरकार-तर्फे कर वसूल केला जातो. आपल्या भवितव्याविषयीं जुवांवच्या मनांत त्यावेळीं तर्कवितर्क चालू होता. मधून मधून तो कार्मिनकडे दयार्द्र दृष्टीनं पाही. क्षणांत एकादा सुस्कारा सोडी. त्याला लागूनच डब्याच्या खिडकीकडे तोंड करून कार्मिन बसली होती. तिनं आपल्या डाव्या

हाताचा कोंपर खिडकीच्या कडेवर ठेवला होता आणि त्याच्या तळव्यावर आपली हनवुटी टेकून ती चिंताग्रस्त नजरेनं बाहेर पहात होती. तोंच—

गाडी कॅसलरॉक स्टेशनवर येऊन थांबली. एक सार्जंट व एक दोन पोलिस शिपाई गाडीच्या प्रत्येक डब्यांत शिरून बारकाईनं पहाणी करूं लागले. फिरत फिरत ते जुवांव नि कार्मिन बसलेल्या डब्यांत आले. त्यांना पहातांच एकदम कसलातरी संशय येऊन कार्मिन एकाएकीं किंचाळली. जुवांव काय समजायचं तें समजला. त्याच्या हातापायाला कांपरं भरलं. तो लाचार दृष्टीनं पोलिसांकडे पाहूं लागला. क्षणांत त्यानं कार्मिनकडे नजर फिरविली. विशेष विचारपूस न होतां पोलिसांनीं त्यांना रीतसर गिरफदार केलं. कार्मिन बोलून चालून बाईमाणूस पडली. तिला तो देखावा पाहून अकस्मात रडूं कोसळलं. ती हुंदके देऊं लागली. जुवांवला वेड लागण्याची पाळी आली होती. त्यानं कपाळावर जोरानं हात मारून घेतला. तो मनाशीं म्हणत होता—“ काय झालं हें ! अखेर आपलं गालबोट हा कधींहि न पुसला जाणारा डागच ठरला तर ?”

—आणि त्याचवेळीं जुवांव आणि कार्मिन यांना पोलिसांच्या पहाऱ्याखालीं बंदिस्त होऊन चाललेलीं जवळच्या लोकांनीं पाहिलीं—



## श्री. ना. के. शिरोडकर

### याचें आगामी वाङ्मय

| | | |
|---|---|---|
| १ | चांदण्यांतील दृश्य .... .... .... | नाटक |
| २ | दीपगृह .... .... .... .... | कथासंग्रह |
| ३ | वाटाड्या .... .... .... | लघुनिबंध |
| ४ | घोड्यांच्या शर्यती .... .... .... | कादंबरी |
| ५ | इन्किलाब झिंदाबाद .... .... .... | कादंबरी |
| ६ | सरोवराच्या कांठीं .... | ( एकांकिका व रेडिओ नाटिका ) |
| ७ | विलायती पंखे .... .... .... | कथासंग्रह |

# किमया

किमया हा श्री. ना. के. शिरोडकरांचा रुपांतरीत कथासंग्रह छोटा आणि चटकदार आहे. कथासंग्रहांत घारी आणि कावळे ह्यांना वाचा फोडली आहे. कुत्रा कुत्रींच्या भावना दाखविल्या आहे. मात्र ह्या भावना सर्व मानव जातीला लागू होणाऱ्या अशाच आहेत. ह्या कथांतून व्हिक्टोरियावाला कासमपासून मोटारवाला मानुएलपर्यंत, घारीपासून कावळ्यापर्यंत आणि महाराष्ट्रीयांपासून व्रह्मी प्रांतियांपर्यंत सर्व तऱ्हेचे नमुने पहावयास मिळतात. ह्या कथांतून लपलेला अर्थबोध आणि तत्त्वज्ञान सामाजिक व राजकीय उन्नतिसाठीं धडपडणाऱ्या हिंदी मनाचें उत्तम प्रतिबिंब दाखविणारें आहे. कविवर्य रविंद्रनाथ टागोरांची काव्यमय गूढता आणि कै. शिवराम महादेव परांजपे यांची व्याजोक्ति यांची किंचित छटा लेखकाच्या लेखनशैलींत दिसून येते. 'बोरीचें झाड' 'पिशाच्चसृष्टींतील प्रणय?' 'झेंडा' आणि 'विनयभंग' ह्या गोष्टी जितक्या बोधप्रद तितक्याच आकर्षक, तत्वप्रधान तितक्याच चटकदार झाल्या आहेत. शिरोडकरांची 'किमया' विचाराला चालना देणारी, विकारांना बंधनें घालणारी आणि भावनांना उत्तेजित करणारी अशीच आहे.

**नवाकाळ** ( ता. २१-११-४० )

[ शिवाय अनेक नियतकालिकांचे अत्युत्कृष्ट अभिप्राय ]

**पुस्तक किंमत १ रुपया**